


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे.

ख्यातकीर्त ग्रंथसंग्राहक, संशोधक, संपादक आणि समीक्षक डॉ. स. गं. मालशे ह्यांच्या संग्रहातील जुन्या नियतकालिकांचे काही अंक संगणकीकरण करून अभ्यासकांना उपलब्ध व्हावेत ह्यासाठी त्यांच्या कन्या डॉ. सुषमा पौडवाल ह्यांनी राज्य मराठी विकास संस्थेला उपलब्ध करून दिले आहेत.

ह्या ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना आपण खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१) सदर ग्रंथांच्या/ नियतकालिकांच्या पीडीएफ प्रती ह्या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.

२) सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.

३) पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्थेची मुद्रा आपणास काढता येणार नाही.

४) आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी ह्या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून ह्या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. ह्यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था ह्यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.






अनुक्रमणिका

# अनुक्रमणिका





काशीनाथ रघुनाथ मित्र.

जन्म—२ नवंबर १८७१.

देहावसान—२३ जून १९२०.








अनुक्रमणिका



श्रीमती बारूबाई शेवडे.



सौ. सुमतिबाई तालीम.






सौ. सुमतिबाई तालीम यांच्या रेशमी विणकामाचे दोन नमुने.



## मनोरंजनाचीं मलपृष्ठें.




वर्ष १ लें, अंक १ ला.




वर्ष ३ रें, अंक २ रा.




वर्ष ९ वें, अंक ३ रा.




वर्ष १८ वें, उ. अंक १ ला.



अनुक्रमणिका




# प. वा. काशीनाथ रघुनाथ मित्र.

मनोरंजनाचे उत्पादक, चालक, मालक व संपादक श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र यांनां तारीख २३ जून १९२० रोजीं मुंबई मुक्कामीं देवाज्ञा झाली हें अत्यंत शोकजनक वर्तमान मनोरंजनाच्या प्रिय वाचकांनां निवेदन करण्याचें आमच्या नशिबीं आलें आहे.

त्यांच्या पोटांत कॅन्सरचा विकार झाला होता. बरेच दिवस कुशल डॉक्टरांनां व वैद्यांनां तो कळून आला नाहीं. शस्त्रप्रयोगानें उदर उघडून पाहिल्यावर तो विकार दृष्टोत्पत्तीस आला, परंतु या वेळीं तो अतिरेकास गेलेला असल्यामुळें अखेरचा उपाय ह्मणून श्रीयुत डॉक्टर गोपाळराव देशमुख यांच्यासारख्या कुशल डॉक्टरांनीं अत्यंत काळजीपूर्वक केलेल्या शस्त्रप्रयोगाचाहि त्याच्यावर तादृश उपयोग न होतां या विकारानें अत्यंत क्षीण केलेलें कुलेवर कालवश झालें !

काशीनाथपंतांनीं एकुणपन्नास वर्षें इहलोकीं वास केला. घरच्या गरीबीमुळें त्यांनां उच्च शिक्षणांचा लाभ मिळूं शकला नाहीं; परंतु अल्पवयांतच त्यांच्या ठिकाणीं प्रादुर्भूत झालेली ज्ञानलालसा वृद्धिंगत होत गेली, त्यामुळें त्यांचे विचार प्रगल्भ बनले, लोकसेवेचें ध्येय त्यांच्या नजरेपुढें चमकूं लागलें, मातृभूमीच्या उद्धाराच्या पुण्यप्रद कार्यांतील कांहीं तरी वांटा आपण उचलावा अशी तळमळ त्यांच्या हृदयाला लागून राहिली, या उच्च ध्येयानें—या तळमळीनें प्रेरित होऊन कोणाचें साह्य नसतां केवळ आत्मविश्वासाच्या बलावर त्यांनीं दृढनिश्चयानें मनोरंजनाची संस्थापना केली.

मनोरंजनाचें संवर्धन करीत असतां त्यांच्या मार्गांत अनेक विघ्नें आलीं, परंतु त्यांचा निश्चय ढळला नाहीं. आपत्तींनां अगर विपत्तीला भिऊन प्रारंभ केलेल्या उत्तम कार्याचा त्यांनीं त्याग केला नाहीं. मनोरंजनाचें संगोपन व संवर्धन करण्यास पंचवीस वर्षें ते अविरत परिश्रमपूर्वक झटले, आणि महाराष्ट्राच्या नियतकालिक वाङ्मयाच्या इतिहासांत त्यांनीं चिरस्मरणीय कामगिरी करून ठेवली. एवढेंच नव्हे तर महाराष्ट्रांतील ज्ञानप्रसाराच्या कार्यास व उदात्त विचारांच्या प्रसारास त्यांनीं फार मोठी मदत केली. काशीनाथपंतांच्या कामगिरीचें व त्यांच्या अंगच्या बहुविध गुणांचें वर्णन, ज्यांनीं त्यांनां अगदीं गरिबीच्या स्थितींतून उदयास चढतांना पाहिलें अशा त्यांच्या परम स्नेह्यांनीं या अंकांत लिहिलेल्या लेखांत केलेलें आहे.




अनुक्रमणिका

प. वा. काशीनाथपंतांनी जें ध्येय पुढें ठेवून व ज्या धोरणानें मनोरंजन चालविलें त्याच ध्येयाला व धोरणाला अनुसरून मनोरंजन पुढें चालेल. मनोरंजनाच्या वाढीच्या कार्यास महाराष्ट्रांतील ज्या लेखकांनीं, कवींनीं, चित्रकारांनीं, फोटोग्राफर्सनीं, व इतर पुष्कळ हितचिंतकांनीं व त्याचप्रमाणें उदारहृदय वाचकवर्गानें साह्य केलें तसेंच साह्य अभिमानानें, आस्थेनें व प्रेमानें मनोरंजनाला सदैव मिळत जाईल असा आह्मांस पूर्ण भरंवसा आहे.

महाराष्ट्रीय बंधुभगिनींच्या प्रेमछत्राखालीं मनोरंजनाचा उत्तरोत्तर उत्कर्ष होवो आणि राष्ट्रोद्धाराच्या कार्यास मनोरंजनाच्या द्वारें मदत करण्याचा प. वा. काशीनाथपंत मित्र यांचा संकल्प पूर्णपणें सिद्धीस जाऊन मनोरंजन ही महाराष्ट्राची एक अत्युपयुक्त संस्था चिरकाल होऊन राहो एवढेंच जगचालकाच्या चरणांपाशीं आमचें नम्रभावें मागणें आहे.

संपादक—मनोरंजन.

## आभारप्रदर्शन व विनंति.

आमचे प्रियबंधु ती. काशीनाथपंत यांच्या निधनानंतर त्यांचे पुष्कळ मित्र, हितचिंतक, मनोरंजनाचे लेखक व वर्गणीदार यांजकडून जीं सांत्वनपर पत्रें व तारा आल्या आहेत, त्यांबद्दल व्यक्तिशः निरनिराळें पत्र पाठवून आभार मानणें शक्य नसल्यामुळें, येथें ते व्यक्त केले आहेत. ते सर्व जण रुजू करून घेतील अशी आशा आहे. या सर्वांनीं आपआपल्या पत्रांत ती. काशीनाथपंतांच्या अंगच्या गुणांचें वर्णन करतांना, जो आदर व जें प्रेम व्यक्त केलें आहे त्याबद्दल ती. काशीनाथपंतांच्या कुटुंबांतील मंडळी फार आभारी आहे. शुभेच्छा व प्रेममय विचार यांची जोड मिळाल्यास, कोणतेंहि अंगीकृत कार्य सिद्धीस जाण्यास फारसा प्रयास पडत नाहीं हा सृष्टीचा नियम व अनुभव आहे. व ही सामुग्री आपणा सर्वांच्या कृपेनें आह्मांला फार आहे, ही जाणीव दुःखाचा क्षणिक विसर पाडून, स्वीकृत कार्य करण्यास जोर देत आहे व त्यामुळें दुःखांतहि समाधान होत आहे.

सांत्वनपर पत्रांचा गोषवारा पुढच्या अंकांत प्रसिद्ध करण्याचा आमचा विचार आहे. अंकास बराच विलंब झाल्यामुळें या अंकांत तो उद्धृत करतां आला नाहीं.

ती. काशीनाथपंतांनीं प्रस्थापित केलेल्या संस्था पुढें चांगल्या रीतीनें चालण्याबद्दल ज्या हितचिंतकांनीं प्रेमळ सूचना व उपदेश केला आहे त्याबद्दल त्यांचा मी अंतःकरणपूर्वक फार आभारी आहें. मनोरंजन ही संस्था ती. काशीनाथपंत मित्रांची नसून सर्व महाराष्ट्राची आहे. तिच्यांत जें उणें दिसेल तें भरून काढण्याविषयीं प्रेमानें सूचना करून तिच्या वाढीस सर्वतोपरी साह्य करावें अशी मराठी भाषाभिमानी सर्व बंधुभगिनींस विनंति आहे.

सर्वांचा नम्र बंधु,

दामोदर रघुनाथ मित्र.




अनुक्रमणिका

# माझी शेवटची विनंति.

आज सुप्रभातीं परमेश्वराला वंदन करून त्यानें माझ्या मनाला शांति दिल्याबद्दल अनन्यभावें त्याला शरण जाऊन ऑपरेशन रूममध्यें जाण्यापूर्वी चार सहा तास आधीं मी हें लिहीत आहें.

माझ्या मातृभाषेची आणि स्वदेशबांधवांची कांहींतरी चांगलीशी सेवा करून महाराष्ट्रांत जन्म घेतल्याचें सार्थक करावें या हेतूनें सुमारें पंचवीस वर्षांपूर्वी मासिक मनोरंजन हें मासिक पुस्तक मीं काढलें, व त्याचें अनेक आपत्तींपासून, अरिष्टांपासून, व संकटांपासून जिवापाड मेहनत करून संरक्षण व संवर्धन करून आजच्या स्थितीला मीं तें आणलें. पैशाचें यत्किंचित् पाठबळ नसतां, माझ्या अंगीं विद्वत्ता किंवा कर्तबगारीहि फारशी नसतां आत्मविश्वास व उत्साह यांच्या बळावर आजच्या स्थितीला हें माझें वाङ्मयरूपी अपत्य येऊन पोंचलें, याबद्दल एक प्रकारें मला धन्यता वाटत आहे, व गेल्या पंचवीस वर्षांत जे विलक्षण त्रास मला सहन करावे लागले व पराकाष्ठेची मेहनत करावी लागली त्यांचा शीण आजच्या मनोरंजनाकडे पाहून मला फारसा वाटत नाहीं; परंतु हें समाधान मला प्राप्त होण्यास माझ्या महाराष्ट्रानें जर मला साहाय्य केलें नसतें, त्यानें आपल्या प्रेमदृष्टीची पाखर जर मनोरंजनावर घातली नसती आणि जगच्चालकाचा जर आशीर्वाद त्याला नसता तर माझें हें अपत्य आजच्या स्थितीला येऊन पोंचतें ना. ह्मणून मी ह्मणतों, कीं, मनोरंजन हें अपत्य माझें नाहीं; तें महाराष्ट्राचें आहे; तें महाराष्ट्रांतील यच्चयावत् बंधुभगिनींचें आहे. माझ्यामागून त्याच्यावर सदैव लोभ ठेवून महाराष्ट्रानें त्याची भरभराट करावी आणि तें चिरस्थायी आणि महाराष्ट्राला ललामभूत होईल अशी व्यवस्था करावी.

या मासिक पुस्तकाच्या कामीं अनेक लेखकांनीं, कवींनीं, चित्रकारांनीं, फोटोग्राफर्सनीं, हितचिंतकांनीं व मित्रांनीं मला परोपरीनें साहाय्य केलें आहे. मी या सर्वांचा अत्यंत ऋणी आहें. मीं आतांपर्यंत मनोरंजनांत व्यक्तीवर हल्ला केलेला नाहीं. तत्त्वावर हल्ला करण्यास कोणाचीहि पर्वा केलेली नाहीं. यापैकीं कोणाचे माझ्या हातून अपराध घडले असतील, कोणाला वाईट वाटण्यासारखें वर्तन माझ्या हातून झालें असेल, जे दोष व ज्या चुका घडल्या असतील त्यांच्याबद्दल आज सर्वांची मी क्षमा मागतों, व मनोरंजनाच्या वाढीस तुह्मां सर्वांची कृपा कारण झाली हें कृतज्ञ अंतःकरणानें निवेदन करून हें आपलें मनोरंजन हातीं धरून पुढें चालवा अशी मी आपणा सर्वांनां प्रार्थना करतों.

मनोरंजन छापखान्याची उभारणी करण्यास ज्या वेळीं मी उभा राहिलों त्यावेळीं, माझ्यासारख्या अल्पसामर्थ्याच्या माणसाच्या हातून हें कार्य कसें काय पार पडेल अशी मला घोर चिंता लागलेली होती. त्यावेळीं मला तात्पुरती मदत करण्यासाठीं महाराष्ट्राला मीं विनंती केली व त्या विनतीला उदार महाराष्ट्राकडून चांगला मान मिळाला. या कामासाठीं मी डिपॉझिटची स्कीम काढली व माझी ती स्कीम महाराष्ट्रानें सढळ हातानें मदत करून यशस्वी केली. मनोरंजन या संस्थेचा उत्कर्ष व्हावा या हेतूनें महाराष्ट्रांतील ज्या थोर अंतःकरणाच्या बंधुभगिनींनीं मनोरंजनाला डिपॉझिट्स दिलीं त्यांचें मनोरंजन सदैव ऋणी राहील. हीं डिपॉझिट्स देतांना पुष्कळांनीं मनोरंजन या संस्थेला तीं आपण देणगीदाखल देत आहोंत, तीं लोन ह्मणून देत नाहीं असा मनोदय त्याच वेळीं व्यक्त केला; परंतु कोणाचेंहि डिपॉझिट् देणगी ह्मणून स्वीकारावें अशी माझी केव्हांहि इच्छा नव्हती. त्या डिपॉझिटसपैकीं ज्यांनीं आपलीं डिपॉझिट्स



अनुक्रमणिका

परत मागितलीं त्यांपैकीं बहुतेकांचीं मीं परत दिलीं आहेत, व एकूणएक डिपॉझिट्स परत करावयाचीं हा माझा निश्चय आहे, व त्याप्रमाणें मीं व्यवस्था केली आहे. आजच सर्व डिपॉझिट्स मीं परत दिलीं असतीं; परंतु चालत्या व्यवहारांतून एवढी मोठी रक्कम एकदम काढून घेतली तर माझ्या मागील मंडळीस व्यवहारांत मोठी अडचण येईल, म्हणून आणखी दोन तीन वर्षें डिपॉझिटर्सनीं आपलीं डिपॉझिट्स मनोरंजनकडे राहूं द्यावीं अशी मी त्यांस विनंति करीत आहें. सर्व डिपॉझिट्स दोनतीन वर्षांच्या आंत परत करण्यांत येतील; परंतु तत्पूर्वीं ज्या कोणास आपलीं डिपॉझिट्स परत पाहिजे असतील त्यांनां तीं अवश्य परत देण्यांत येतील. तथापि माझ्या वरील विनंतीस मान दिल्यास मनोरंजन या संस्थेला डिपॉझिट्स देणाऱ्या, मनोरंजनाचा अभिमान बाळगणाऱ्या, प्रियबंधुभगिनींनीं फार मोठें साह्य केल्यासारखें होईल.

मनोरंजनाची संस्था सुदृढ पायावर चालावी अशी माझ्या मतें मला सुचलेली सर्व व्यवस्था मीं करून ठेविली आहे. 'सत्यसंकल्पाचा दाता नारायण' ती यशस्वी करील असा मला भरंवसा आहे. मनोरंजन संस्थेसाठीं तिची स्वतांची इमारत असावी अशी माझी फार इच्छा होती, मनोरंजनाची सुदृढ पायावर कायमची उभारणी व्हावी या हेतूनें एक लिमिटेड कंपनी स्थापन करण्याचें मीं योजिलें होतें, हें महाराष्ट्रास विदितच आहे. या कंपनीचें जें भांडवल मीं ठरविलें होतें त्याच्यापेक्षां कितीतरी जास्त रकमेची मदत मला देण्यास महाराष्ट्र तयार होतें. तशीं खात्रीचीं आश्वासनेंहि मला मिळालीं होतीं; परंतु माझ्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें व दिवसेंदिवस वाढत जाणाऱ्या आजारामुळें त्या योजनेला मूर्त स्वरूप देण्यास मी असमर्थ झालों; तथापि मनोरंजन संस्थेची स्वताची इमारत असावी ही जी माझी इच्छा आहे ती पूर्ण करण्यास महाराष्ट्र उदार अंत:करणानें मदत करील असा मला पूर्ण भरंवसा आहे. या इमारतींत मनोरंजन संस्थेचीं सर्व कामें व्हावयाचीं व कारखान्यांतील कामगार मंडळीचीहि त्यांत सोय व्हावयाची अशी माझी योजना आहे. या कामासाठीं पंचवीस रुपयांचे शेअर काढून एकलक्ष रुपयांचें भांडवल उभारावयाचें असें योजलेलें आहे. शेअरच्या रकमेवर नक्की दरसाल दरशेंकडा पांच टक्के व्याज देण्यांत येईल. ही इमारतीस लागणारी रक्कम धनिकांकडून सहज मिळवितां आली असती, परंतु महाराष्ट्राच्या मनोरंजन संस्थेची इमारत महाराष्ट्रांतील बंधुभगिनींच्या साह्यानेंच उभारली जावी असा माझा हेतु असल्यामुळें सदरहू योजना मीं ठरविली आहे. माझी ही इच्छा महाराष्ट्रानें पूर्ण करावी व मनोरंजनाला स्वताची इमारत बांधून देऊन चिरस्थायी करावें अशी महाराष्ट्रापाशीं माझी शेवटची मागणी आहे.

सेवा करावी एवढ्याचसाठीं ईश्वर आम्हाला इहलोकीं पाठवितो. माझ्या हातून जी सेवा झाली ती क्षुद्र होती तथापि माझ्या हातून ती घडली एवढ्याबद्दल मृत्युशय्येवर मला समाधान वाटत आहे, आणि तो पुढें जी सेवा नेमून देईल ती करण्यास मी आतां जात आहें.

माझ्या हातून कळून अगर नकळून ज्या कोणाचे अपराध घडले असतील त्यांनीं मला त्याजबद्दल क्षमा करावी, आणि परमेश्वरानें मला क्षमा करावी हीच माझी शेवटची याचना आहे.

मुंबई,
१९ जून १९२०.

काशिनाथ रघुनाथ मित्र




अनुक्रमणिका

# ‘ हिरा हरपला ! ’

कवि–श्रीयुत नारायण केशव वेहरे, एम्. ए., बी. एस्सी., एल्. टी.

जयें स्वधन वेंचुनी ललित भूषणें अर्पिलीं
प्रसन्न बहु शारदा निरखुनी तयां जाहली !
असे खचित भक्त जो जनिं सरस्वतीचा पुरा
अहा हरपला हिरा ललितवाङ्मयाचा खरा !

झिजे शतक–पाव जो रिझविण्या मराठी–मन
नसे मुळिंच ठाउकें जगिं दुजें मनोरंजन !
कला ललित बोलती, सुभग मित्र, हा आसरा
असा हरपला हिरा ललितवाङ्मयाचा खरा !

टिपें सतत ढाळितो टपटपा महाराष्ट्र हा
सुरत्न हरपे, म्हणे स्मरुनियांच सेवा महा !
कशा कुशल लेखन्या प्रगटवी मनोरंजनीं
हिरा हरपतां स्फुरे हृदय–गीत आक्रंदुनी !

---





अनुक्रमणिका

# प. वा. काशीनाथपंत मित्र.

लेखक—श्रीयुत गोविंद मल्लिनाथ ठेंगे, बी. ए.

"जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च । तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥" या भगवद्वचनांत सांगितल्याप्रमाणें जो प्राणी जन्मास आला त्याला मरण हें निश्चित होय. जननमरणाचा हा रहाट जगाच्या आरंभापासून अव्याहत चालू असतां मरणाबद्दल शोक तो कशाचा ? असंख्यात प्राणी हरहमेश जन्माला येतात व असंख्यात मरण पावतात. या दृष्टीनें पाहिलें असतां, वरील भगवद्वाक्यांतील विचारसरणी सामान्यजनांसंबंधानें अगदीं यथार्थ आहे; परंतु सदा ज्यांनीं आपलें आयुष्य लोकसेवेंतच वेचिलें आहे अशा थोर विभूति या विचारसरणीस अपवादात्मक होत. अशांच्या वियोगाबद्दल आपणास हळहळ वाटणें, शोक वाटणें हें अगदीं साहजिक होय. अशा विभूतींपैकींच आपले परलोकवासी स्नेही काशीनाथपंत मित्र हे एक होत. काशीनाथपंतांचें वय मरणसमयीं एकूणपन्नास वर्षांचें होतें.त्यांतील अर्ध्यापेक्षां अधिक आयुष्य त्यांनीं आपल्या माय भाषेच्या—मराठी वाङ्मयाच्या—द्वारें महाराष्ट्राच्या सेवेंत वेचिलें.ही सेवा त्यांनीं आपलें तन—मन—धन सर्वस्वीं अर्पण करून केली. त्यांच्या या सेवेचा परिणाम असा झाला, कीं, 'मनोरंजन' हें प्रत्येक महाराष्ट्रीयाचें प्रिय मासिक पुस्तक होऊन राहिलें आहे. अर्थात् तेणेंकरून काशीनाथपंतांनीं प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या अंतःकरणांत आपलें नांव कोरून ठेविलें आहे. आपल्या 'मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी'च्या द्वारें त्यांनीं मराठी भाषेंत उत्तमोत्तम ग्रंथांची भर घालून तिला समृद्ध करून ठेविलें आहे.शेवटीं,हें आपलें महाराष्ट्र वाङ्मयाभिवृद्धीचें पवित्र कार्य स्वतंत्रपणें सतत व निर्विघ्न चालू रहावें एतदर्थ त्यांनीं स्वतःचा 'मनोरंजन' छापखानाहि काढून तो स्वल्पावधींत नमुनेदार रीतीनें थाटिला. या सर्वांमुळें त्यांनीं महाराष्ट्रीयांनां उपकारबद्ध करून ठेविलें आहे, व ते आणखी कांहीं वर्षें जगते तर याहीपेक्षां त्यांचें कार्यक्षेत्र विस्तार पावून त्यांच्या हातून महाराष्ट्रीयांची आणखीहि अमोलिक सेवा घडली असती. त्यांच्या अकालिक मृत्यूमुळें आपली अपरिमित हानि झाली आहे, हें निःसंशय होय.

माझा व प. वा. काशीनाथपंतांचा दृढसंबंध वीस वर्षांपेक्षां अधिक होता. या अवधींत ज्या निःसीम प्रेमरज्जूनें त्यांनीं मला बद्ध करून ठेविलें, सुखदुःखाच्या अनेक प्रसंगीं जें साहचर्य केलें, 'मनोरंजन'व महाराष्ट्र वाङ्मय यांच्या अभिवृद्ध्यर्थ एकत्र विचार करण्यांत जो सुखाचा कालक्षेप केला, त्या सर्व गोष्टींच्या आठवणी मनांत उभ्या राहिल्या ह्मणजे माझ्या शेष राहिलेल्या आयुष्यांत त्यांच्या मृत्यूनें जी एक उणीव उत्पन्न केली आहे ती भरून येणें सहसा अशक्य आहे असें वाटून मन उदास होतें. काशीनाथपंत तर आपणास सोडून गेले आहेतच; परंतु आपल्या पश्चात् आपल्या सच्चरित्राच्या आठवणी त्यांनीं आह्मांकरितां ठेविल्या आहेत. त्यांच्या चिन्तनांतच काशीनाथपंतांच्या वियोगजन्य दुःखाचें शमन करून घेणें भाग आहे.

काशीनाथपंतांच्या सहवासापासून अनेक लाभांची जोड मला मिळाली आहे.त्यांतील महल्लाभ ह्मटला ह्मणजे विद्वज्जनसमागम हा होय. पुष्कळ वर्षेंपर्यंत सकाळीं एक तास व संध्याकाळीं कचेरींतून परत आल्यावर एक तास असे निदान दोन तास तरी त्यांच्या समागमांत 'मनोरंजन' कचेरींत





अनुक्रमणिका

घालविण्याचा माझा नित्यक्रम असे. त्या ठिकाणीं ज्या ज्या वेळीं जावें तेव्हांतेव्हां जुनेनवे, लहानथोर, मुंबईतील व परगांवांतील विद्वान् लेखक, ग्रंथकार, कवि त्यांच्या मेजासभोंवतीं आनंदानें विविध विषयांची चर्चा करीत बसलेले आढळून यावयाचेच. जणूं काय ' मनोरंजन ' कचेरी ह्मणजे मुंबईतील एक प्रमुख 'लिटररी क्लब'च. अशा तऱ्हेची एखादी तरी संस्था मुंबईसारख्या सर्व प्रकारच्या चळवळींच्या व 'हिंदुस्तानांतील पहिलें' असें गणिलें गेलेल्या शहरीं नसावी ही मराठी वाङ्मय व साहित्य यांच्या अभिमान्यांस लाजविणारी स्थिति होय, व ही उणीव दूर करण्याकरितां अशी संस्था निर्माण करून तिची कायमची स्थापना आपल्या या शहरीं व्हावी असा विचार आह्मां उभयतांच्या व इतर कांहीं स्नेह्यांच्या मनांत वारंवार येई. तशा प्रकारच्या उपक्रमास थोडीशी सुरवातहि झाली होती; परंतु विचारास कृतीचें स्वरूप येण्याच्या पूर्वींच काशीनाथपंतांस मृत्यूनें गांठलें हें दुर्दैव होय.

१९११ सालच्या उन्हाळ्यांत माझ्या प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें काशीनाथपंतांबरोबर मी लोणावळ्यास रहावयास गेलों होतों. त्या ठिकाणीं देखील उपरिनिर्दिष्ट 'लिटररी क्लबा'चा थाट उडून राहिला. कोणीना कोणीतरी विद्वान् पाहुणे मंडळी मुंबई, पुणें, नगर, इंदूर वगैरे ठिकाणांहून काशीनाथपंतांच्या भेटीस येऊन एखादा दुसरा दिवस राहून जात असत. अशा आनंदाच्या स्थितींत माझें दुखणें औषधाशिवाय बरेंचसें पळालें. एके दिवशीं सकाळीं आह्मी प्रातर्विधि आटोपून चहावगैरे घेऊन नेहमींप्रमाणें सकाळची सहल करण्याकरितां बाहेर पडण्याच्या बेतांत असतां आमचे परमपूज्य स्नेही आधुनिकमहाराष्ट्रकविकुलललामभूत प.वा.रेव्हरंड नारायण वामन टिळक आमच्या बंगल्याच्या आवारांत अवचित येऊन ठाकले. ती प्रेममूर्ति पाहिल्याबरोबर आह्मी हर्षभरित झालों, व खालीं उतरून त्यांनां वर घेऊन गेलों. आह्मी आमचा बाहेर जाण्याचा बेत रहित करून त्यांचा परामर्ष घेण्याकरितां घरींच राहिलों. त्यांचाहि मुखमार्जनविधि, चहापान वगैरे आटोपल्यावर आह्मी गप्पा मारीत बसलों. गप्पांचा विषय मुख्यत: महाराष्ट्रवाङ्मय व साहित्य यांची चर्चा व तत्संबंधीं काशीनाथपंतांनीं केलेली महाराष्ट्रसेवा हाच होता. त्यांत ओघाबरोबरच काशीनाथपंतांच्या अंगांतील चिकाटी, उद्यमशीलता, सहिष्णुता, प्रेमळपणा, सौजन्य, लेखकवर्गाशीं त्यांचें बन्धुत्वाचें नातें वगैरे गुणांचा उल्लेख करून कविवर्य मला ह्मणाले "काय हो, मि. ठेंगे, हे आपले मित्र खरोखर लोकमित्र आहेत, नाहीं काय?" मी ह्मटलें "यांत संशय काय? या ठिकाणींदेखील त्यांचें आगमन मित्रकार्याकरितांच झालें आहे!" लगेच कविवर्य प्रेमभरांत येऊन आपल्या गोड आवाजांत त्यांनीं आपलें एक चिमुकलें रसाळ पद्य आह्मास गाऊन दाखविलें. कवि प्रेमरंगांत येऊन आपण निर्माण केलेल्या आपल्या काव्यसृष्टींत स्वैर रममाण होऊन तल्लीन झाले असतां बाह्यसृष्टीच्या दृष्टीनें ते कसे वेडे बनतात हा प्रकार प्रत्यक्ष अनुभवण्याचा अपूर्व प्रसंग त्या वेळीं आह्मांस लाभला. त्या वेळच्या गाण्याचे मधुर आलाप अजून माझ्या कर्णरन्ध्रांत खेळत आहेत. तें पद्य खरोखर आपण आपल्या हृदयांत अहर्निश सांठवून ठेवण्याच्या योग्यतेचें असल्यामुळें तें येथें देणें अप्रासंगिक होणार नाहीं:—

**' लोकमित्र.**

[ चाल—" आज मीं ब्रह्म पाहिलें " ]

खरोखर लोकमित्र ते<br>
सेवक आपण सकल जनांचे, ।



अनुक्रमणिका

स्वप्नीं ठाऊक अन्य न अपुलें । ज्यांस जगीं नातें ॥ ध्रु० ॥
उदार हृदयें, गंभीर वृत्ती,
जी जीवीं ती सत्यीं प्रीती,
रविमंडलही भेदुनि भूतीं । संतत शोभे ते ! १
रुची न ज्यांची भिकार वित्तीं,
बुद् बुद् केवळ ज्यांनां कीर्ती,
कार्य न ज्यांच्या क्षणही चित्तीं । लोकहितापरतें; २
लोकहितीं पितयाची चिंता,
संवर्धनिं मातेची ममता,
धरिती जनपरिचर्या करितां । सृष्टीसम समते; ३
जनसेवा ही ईश्वरसेवा,
याविण दुसरा धर्म न ठावा,
प्रेम आणखी देव दिसावा । एक सदा ज्यांतें; ४
धन्य ! धन्य ! ह्या धन्य विभूती !
प्राप्ती ह्यांची स्वर्गप्राप्ती !
देवा, यांची भारतजगती । वाट सदा बघते !" ५

वरील पद्यांत कवीनें वर्णिलेल्या विभूतिवर्गांपैकींच काशीनाथपंत हे एक होते. 'जनसेवा' हीच त्यांची 'ईश्वरसेवा' होती, आणि 'प्रेम' हेंच त्यांचें 'दैवत' होतें.

त्यांचा माझा प्रत्यक्ष परिचय १९०० सालीं झाला.तो होण्यापूर्वीं कांहीं दिवस मी माझ्या एका मित्राबरोबर—जो त्यांचाहि मित्र होता—एक लहानसा लेख 'मनोरंजनां'त प्रसिद्ध करण्याकरितां पाठविला होता.याच मित्रानें काशीनाथपंतांचा व माझा प्रत्यक्ष परिचय घडवून आणिला.त्या वेळीं आह्मी प्लेगानिमित्त शहराबाहेर'मरीनलाइन्स हेल्थक्यांप'मध्यें रहावयास गेलों होतों.सुदैवानें आह्मांस झोंपड्यांत एकमेकांच्या शेजारींच रहाण्याचा सुयोग आला होता. या आमच्या प्रथम परिचयाच्या वेळीं जें कांहीं आमचें संभाषण झालें त्यांत त्यांनीं पहिलाच प्रश्न जो मला विचारला तो असा—"आपण 'मनोरंजना'-करितां लेख कां लिहीत नाहीं ?" मीं ह्मटलें "कोणत्याहि विषयावर भरपूर, मुद्देसूद, भारदस्त लेख लिहिण्याला एकंदरीनें जी पात्रता लागते ती माझ्यामध्यें नाहीं, व ती अंगीं आल्याशिवाय लिहिणें व्यर्थ होय असें मला वाटतें." त्यावर ते ह्मणाले "असें आपणास वाटणें साहजिक आहे; परंतु केवळ हीच सबब पुढें करून आपल्यासारख्या मंडळीनें जर लिहिण्याचें मनावर घेतलें नाहीं तर 'मनोरंजना'चें जीवित्व संशयांतच रहाणार आहे." मी ह्मटलें "आपण ह्मणतां तें सर्व खरें आहे; परंतु अपूर्ण ज्ञानाच्या,अपरिपक्व विचारांच्या,त्याचप्रमाणें सुंदर,शुद्ध,व मनोवेधक भाषेंत न लिहिलेल्या लेखांचा अंतर्भाव आपल्या मासिकांत झाल्यानें त्याचा दर्जा कमी होणार नाहीं काय ? लोक नाक मुरडणार नाहींत काय ? अशा लेखांपासून लेखकाच्या अंगांत मी आतां लेखक बनलों अशा वृथाभिमानाचें व त्यांच्या प्रगतीस हानिकारक असें वारें संचरणार व शिवाय आपलें मासिक वाचकांनां अप्रिय होणार तें होणारच, हें उभयपक्षीं नुकसानकारक नव्हे काय ?" यावर आणखी कांहीं प्रश्नोत्तरें




अनुक्रमणिका



**सारस्वत विद्यार्थी साहायक मंडळीची एक माजी मॅनेजिंग कमिटी.**

मागें उभे—प. वा. का. र. मित्र; प. वा. रा. सा. गो. मा. डुकले, बी. ए.; श्रीयुत कानविंदे.

बसलेले—श्रीयुत व्यं. आ. लाजमी, बी. ए.; आ. बा. सबनीस, बी. ए.; वा. बा. ठाकूर, बी. ए.; गो. म. ठेंगे, बी.ए. प. वा. डॉ. अ. ना. सांबारे; श्रीयुत पं. का. तेलंग, एम्. ए., एलएल्. बी.; दि. स. वर्दे, बी. ए., एलएल्. बी.; शां. वि. दिवाडकर, बी. ए.



सौ. मनोरमाबाई मित्र. का. र. मित्र.
प. वा. कुमारी दुर्गाबाई.

झाल्यावर ते शेवटीं ह्मणाले " आपण ह्मणतां त्या बाबतींतील सर्व जबाबदारी व जोखीम माझ्या शिरावर आहे. त्याबद्दल आपणास काळजी नको. मग आपणास 'मनोरंजना'करितां लिहिण्यास काय हरकत आहे?" "पाहूं त्याचा विचार." असें ह्मणून मीं इतर विषयांकडे संभाषणाचा ओघ वळविला; परंतु काशीनाथपंत कांहीं आपला मूळ मुद्दा विसरले नव्हतेच. दोन-अडीच तास याप्रमाणें मजेनें गप्पांत घालविल्यावर मी आपल्या झोंपडींत जावयास उठलों तेव्हां त्यांनीं लगट करून जवळ असलेल्या फळीवरून चारपांच मराठी पुस्तकें काढून मजकडे दिलीं व मोठ्या गोड वाणीनें व विनवणीच्या रूपानें मला त्या पुस्तकांचें फावल्या वेळीं परीक्षण करण्यास सांगितलें. अर्थात्, तीं पुस्तकें बगलेंत मारून मुकाट्यानें घरीं येण्याशिवाय मला गत्यंतर नव्हतें! सारांश, मला त्यांनीं कसेंबसें एक लेखक बनविलें; परंतु या कामीं त्यांची हातोटी एवढी कांहीं विलक्षण होती, कीं, त्यांनीं 'मनोरंजना' करितां आपल्या प्रेमळ स्वभावानें व गोड व मन वळविणाऱ्या वाणीनें बरेच लेखक बनविले असा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे. आत्मविश्वास हा गुण त्यांच्या अंगीं पूर्णपणें बाणलेला होता व तो दुसऱ्याच्या अंगीं उत्पन्न करण्याचें सामर्थ्यहि त्यांच्यामध्यें विलक्षण होतें. उत्तम लेखक होण्याची पात्रता अंगीं असूनहि आत्मविश्वासाच्या अभावीं आपण केव्हांहि लेखक होऊं शकणार नाहीं अशा भीतीनें आपल्या अंगांतील पात्रता व्यर्थ दवडणारी पुष्कळ होतकरू मंडळी त्यांच्या प्रोत्साहनानें लेखक बनली. वाङ्मयाभिवृद्धीसंबंधानें ही त्यांची कामगिरी खरोखरच वाखाणण्यासारखी आहे.

'मनोरंजना'शिवाय ह्मणजे आपल्या विशिष्ट धंद्याशिवाय इतर बाबतींत ह्मणजे सामाजिक वगैरे बाबतींतहि, ते पूर्ण कळकळीनें मन घालीत, असें मला आमच्या प्रथम परिचयाच्या वेळींच दिसून आलें. समाजांत कोणत्या सुधारणा रूढ झाल्या पाहिजेत, त्या कोणत्या उपायांनीं शक्य होतील वगैरे गोष्टींचा ऊहापोह फावल्या वेळीं ते आपल्या मित्रमंडळीबरोबर करीत असत. त्याचें मत असें होतें, कीं, सर्व सुधारणांच्या आधीं आपल्या हिंदु समाजांत शिक्षणाचा प्रसार जारीनें झाला पाहिजे. आपल्या देशांत शिक्षणाचें प्रमाण इतर सर्व सुधारलेल्या देशांपेक्षां अत्यल्प आहे, व त्यामुळें सर्वत्र अज्ञानांधःकार पसरला आहे. तो शिक्षणप्रसारानें नष्ट झाल्याशिवाय कोणत्याहि सुधारणेच्या बाबतींत आपलें पाऊल निश्चयानें कायमचें पुढें पडणें शक्य नाहीं. याच विचाराचें परिणतरूप त्यांनीं आपल्या कांहीं मित्रांच्या मदतीनें स्थापन केलेली 'सारस्वत विद्यार्थी साहाय्यक मंडळी' ही संस्था होय. ही यांच्याच आरंभींच्या परिश्रमानें आज मजबूद पायावर एक नमुनेदार संस्था होऊन बसली आहे. काशीनाथपंत कट्टे सुधारक असून जातिभेदाच्या अगदीं विरुद्ध असतांना फक्त सारस्वतां-पुरत्याच असलेल्या या संस्थेचा पुरस्कार त्यांनीं कसा केला या आक्षेपाचें या ठिकाणीं थोडक्यांत निरसन करणें अप्रासंगिक होणार नाहीं. जातिभेद आज कित्येक शतकें हिंदु समाजाच्या हाडींमासीं खिळलेला असल्यामुळें तो थोडक्या अवधींत एकदम नष्ट होणें कदापि शक्य नाहीं. ह्मणून आज आहे त्याच स्थितीचा फायदा घेऊन व आपल्यांतील अनेक जाती आपल्या या अखिल हिंदुसमाज-रूप शरीराचे केवळ निरनिराळे घटकावयवच आहेत असें आपण कल्पून या प्रत्येक अवयवांत एकसमयावच्छेदेंकरून ज्ञानामृत घातलें असतां समग्र समाजांत त्याचा संचार होऊन तो एकदम ज्ञानमय होईल, व असें झालें असतां विचारजागृति होऊन जातिभेद आपोआपच नाहींसा




अनुक्रमणिका

होण्याच्या मार्गास लागेल, व सर्व हिंदुसमाज एकरूप, एकजीव होईल. या विस्तृत आणि उदात्त भावनेवर या संस्थेची स्थापना मुळांत झाली आहे. असो. काशीनाथपंत स्त्रीशिक्षणाचे पक्के पुरस्कर्ते होते. "यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः" "गृहं तु गृहिणीहीनं कान्तारादतिरिच्यते" हीं त्यांचीं ध्येयवाक्यें होतीं. स्त्रीशिक्षणाचा प्रसार हें 'मनोरंजना'चें आद्य ध्येय आहे. आरंभीं या कार्याकरितां त्यांनीं आपलें कुटुंब प. वा. सौ. मनोरमाबाई मित्र यांच्या संपादकत्वाखालीं "महाराष्ट्रमहिला" या नांवाचें स्वतंत्र मासिक पुस्तक चालविलें होतें. हें खरोखरच त्या कार्यास वाहिलेलें एक नमुनेदार मासिक असून लोकादरास बरेंच पात्र झालें होतें. हें दोन वर्षें चाललें. पुढें तें 'मनोरंजना'च्या वाढत्या कामामुळें बंद ठेवण्यांत आलें, व त्यांतील विषयांचा अंतर्भाव 'मनोरंजनां'तच करण्यांत आला. स्त्रीशिक्षणाचें कार्य 'मनोरंजन' उत्तम प्रकारें करीत आलें आहे, हें या ठिकाणीं नमूद करणें अनावश्यक आहे. तथापि त्याचें उपरिनिर्दिष्ट भावंड आजमितीस हयात असतें तर काशीनाथपंतांच्या नेहमींच्या उद्यमशीलतेमुळें तें स्त्रियांकरितां स्वतंत्र असें एक अपूर्व मासिक बनून राहिलें असतें, हें निःसंशय होय. काशीनाथपंतांचीं इतर सामाजिक बाबतींसंबंधीं मतें हि पूर्णपणें प्रागतिक होतीं. त्यांनां प्रौढविवाह, पुनर्विवाह, मिश्रविवाह संमत होते. अस्पृश्य वर्गाच्या उद्धाराबद्दल त्यांची कळकळ असामान्य होती. समाजसुधारणेचें सर्वांगीण गाडें पुढें ढकलण्याचे त्यांचे प्रयत्न 'मनोरंजना'च्या द्वारें सतत चालू होते, व ते प्रयत्न सर्वांस प्रिय व्हावेत अशाच धोरणानें चालू होते. 'मनोरंजन' पूर्ण सुधारणावादी असून तें सुधारकांस व जुन्या पक्षास—उभयतांस हि सारखें प्रिय झालें आहे, ही गोष्ट लक्ष्यांत घेतांना आपलें धोरण व ध्येय 'मनोरंजनां'त अव्याहत कायम राखण्यांत त्यांनीं जी विलक्षण कर्तबगारी व मनोधैर्य दाखविलें त्यांचें सहसा कौतुक वाटल्यावांचून रहाणार नाहीं.

काशीनाथपंतांच्या चरित्रापासून तरुण पिढींतील सुशिक्षितांनीं पुष्कळ बोध घेण्यासारखा आहे. काशीनाथपंत मुंबईस येण्यापूर्वीं कोंकणांत एक मराठी शाळामास्तर होते, अर्थात् त्यांचें फक्त मराठी शिक्षण पूर्ण झालें होतें. इंग्रजी हायस्कूल-शिक्षण किंवा युनिव्हर्सिटी शिक्षणाचा त्यांनां बिलकुल गन्ध नव्हता. अशा स्थितींत त्यांनीं पंचवीस वर्षांपूर्वीं स्वतःच्या हिंमतीवर मराठी मासिक पुस्तक सुरू करण्याचा हिय्या केला, व मार्गांत आलेल्या अनेक प्रकारच्या दुर्धर अडचणींस न जुमानतां क्रमाक्रमानें त्यास इंग्रजींतील श्रेष्ठ दर्जाच्या सचित्र मासिक पुस्तकांच्या जोडीला आणून बसविलें. हा त्यांनीं जो पराक्रम करून दाखविला तो कांहीं लहान सहान नव्हे. जे आरंभापासून या मासिकाची वाढ लक्ष्यपूर्वक पहात आले असतील त्यांनां या गोष्टीची पूर्ण सत्यता दिसून येईल. आरंभीं पैशाचें बिलकुल बळ नसतांना, उच्च शिक्षणाची जोड नसतांना वाङ्मयासारखें पूर्ण जबाबदारीचें व राष्ट्रदृष्ट्या अतिमहत्त्वाचें क्षेत्र त्यांनीं आपल्या कार्याकरितां बुद्धिपुरःसर निवडून काढिलें, आणि त्यांत अनुपम यश संपादन केलें. तेणेंकरून "पशुका होत पन्हैया नरका कछु नहीं होत। नर करनी करे तो नरका नारायण होत" या तुलसीदासांच्या दोहऱ्याची सत्यता त्यांनीं आह्मास पूर्णपणें पटवून दिली आहे. मनुष्य कोणत्याहि स्थितींत असो, त्यानें पक्क्या निर्धारानें कोणतीहि कामगिरी हातांत घेऊन यशापयशाची बिलकुल पर्वा न ठेवितां ती पार पाडण्याच्या उद्योगास तो चिकाटीनें लागला, कीं, त्याच्या वांट्यास पुढेंमागें यश हें ठेविलेलेंच आहे असें समजावें. आपली गरिबी, आपलें तुटपुंजें शिक्षण हींच नेहमीं उरापोटाशीं बाळगून काशीनाथपंत आपल्या निकृष्ट





अनुक्रमणिका

स्थितींत संतुष्ट राहिले असते तर महाराष्ट्राच्या कर्त्या पुरुषांत त्यांची आज जी गणना झाली आहे ती कदापि झाली नसती. त्यांनीं धोपट मार्ग सोडून देऊन साहसपूर्ण वृत्तीनें जो नवीन मार्ग स्वीकारला तो चिकाटीनें, निर्धारानें व उद्यमशीलतेनें आक्रमण केला. मग त्यांत त्यांनां पूर्ण यश आलें यांत नवल नाहीं. आमच्यांतील तरुण पिढींतील मंडळी एकदां विश्वविद्यालयाच्या आर्ट्सकोर्स परीक्षांच्या चक्रांतून सुटली, कीं, बहुशः एल्एल्. बी. किंवा नोकरी यापलिकडे कांहीं आहे असें त्यांनां वाटतच नाहीं. आजुबाजूला त्यांनां कांहीं मार्गच उमगून येत नाहींत, त्यामुळें एकाच धोरट मार्गांत पडून स्वतःस व समाजास ते निरुपयोगी बनतात अशी अत्यंत शोचनीय स्थिति आढळून येते. अशांच्या पुढें काशीनाथपंतांचें चरित्र आदर्शरूपानें असणें अवश्य आहे. काशीनाथपंतांनां उच्च शिक्षणाच्या अभावीं देखील जें साध्य झालें तें आमच्या सुशिक्षित तरुण मंडळीला कितीतरी अधिक पटीनें सुसाध्य झालें पाहिजे ! मात्र काशीनाथपंतांच्या अंगीं जे गुण होते ते संपादन करण्याची त्यांनीं तयारी केली पाहिजे. ते गुण म्हटले म्हणजे साहस, आत्मविश्वास, चिकाटी, उद्यमशीलता, कल्पकता, सहिष्णुता, प्रेमळपणा, साधेपणा, गोड वाणी व मनमिळाऊ व विनम्र शांत स्वभाव या गुणांपैकीं एकदोन गुण अंगीं असले तरी ते साधारणपणें उत्कर्षास कारणीभूत होतात. मग या सर्व गुणांचा समुच्चय जर एके ठिकाणीं झाला तर आणखी कशाची उणीव रहाणार आहे ? त्या ठिकाणीं सर्व कांहीं सुकर व सुसाध्य झालेंच पाहिजे. अर्थात् थोर विभूतींच्या अंगीं यांतील पुष्कळसे किंबहुना सर्व गुण एकवटलेले असतात हें निर्विवाद होय.

'मनोरंजना'ला हल्लीं जी उत्तमोत्तम इंग्रजी मासिकाची बरोबरी प्राप्त झाली आहे ती आणण्याकरितां काशीनाथपंतांनीं जो अविश्रांत उद्योग केला त्याची कल्पना करणें देखील अशक्य आहे. लेखांच्या संबंधानें, ते आपल्या निश्चित धोरणास अनुसरून असावे, त्यांची भाषा सुंदर असावी, त्यांतील विचार उदात्त असावे, व कोणत्याहि प्रकारें नीतिभंग करणारे नसावे, असेच लेख मनोरंजनांत यावे एतदर्थ ते फार बारकाईनें सर्व लेखांचें स्वतः निरीक्षण करून निवड करीत. 'मनोरंजनां'त कोणकोणते नवीन विषय यावे या विचारास वर्षाची अखेर होण्याच्या पुष्कळ आधींपासूनच ते लागत असत. या सर्व बाबतींत ते आधीं आपल्या मित्रांचा सल्ला घेऊन मग पूर्ण विचार करून सर्व गोष्टी स्वतः ठरवीत. मासिक सचित्र केल्यानंतर देखील ते चित्रांची निवड वरील पद्धतीनेंच करीत. हें मासिकाच्या अंतरंगासंबंधानें झालें. तसेंच मासिकाच्या बाह्यांगांत वारंवार कोणते फेरबदल व्हावेत, त्याच्या मलपृष्ठावरील डिझाइनमध्यें काय सुधारणा करावी, वगैरे बारीकसारीक अशा वाटणाऱ्या गोष्टींविषयीं देखील ते फार काळजी बाळगीत. मुंबईतील 'टाइम्स आफ् इंडिआ' हें सुप्रसिद्ध इंग्रजी दैनिक खिस्टमसनिमित्त दरवर्षी सुंदर व सचित्र खास अंक प्रसिद्ध करीत असतें. विलायतेंतदेखील सर्वमान्य मासिक पुस्तकें खिस्टमसनिमित्त आपापले खास अंक काढीत असतात. त्या धर्तीवर आपणहि सुरवात करावी व 'मनोरंजना'चा दिवाळीप्रीत्यर्थ खास अंक काढावा, असें काशीनाथपंतांच्या मनांत आलें व हा आपला संकल्प त्यांनीं आपल्या खासगी मित्रमंडळीस जाहीर केला. त्या वेळीं, विलायतेंत जीं मासिकें असे खास अंक काढतात तीं सधन असतात, त्यांचे स्वतःचे गोठमोठाले छापखाने वगैरे असतात, शिवाय खास अंकांच्या लाखों प्रती खपून त्यांस किफायतहि होते वगैरे अनेक गोष्टी त्यांच्या मित्रमंडळीनें त्यांच्या कानावर घातल्या; परंतु कल्पना जर






अनुक्रमणिका

उत्तम आहे व ती अमलांत आणावयाची आहे तर मग साधनें अनुकूल आहेत किंवा नाहींत हा त्यांच्या मतें गौण विचाराचा प्रश्न होता. 'मनोरंजन' केव्हांहि पैशाच्या दृष्टीनें फायदेशीर नव्हतें व त्यांतहि खास अंक काढल्यास अतोनात नुकसान होण्याचा संभव होता, तरी ते बिलकुल डगमगले नाहींत. नेहमीं कांहीं तरी नवीन सुधारणा करीत असलें पाहिजे, नफानुकसानीचा प्रश्न अलाहिदा आहे, या आपल्या तत्त्वास व आपल्या साहसी स्वभावास अनुसरून त्यांनीं सुरुवात ही केलीच. त्यांत त्यांनां शेवटीं बरेंच यश येऊन 'मनोरंजना'चा दर्जा पुढें झपाट्यानें वाढत चालला. नंतर कांहीं वेळ दिवाळीच्या अंकांच्या ऐवजीं वसंताचे खास अंक काढण्यांत आले. परंतु यूरोपांतील महायुद्ध जसें इतरत्र तसें या धंद्यासहि अतिशय जाचक झाल्यामुळें ते कांहीं काल बंद ठेवणें भाग पडलें. तथापि बक्षिस पुस्तकांची वार्षिक भेट ही त्यांनीं चालूच ठेविली.

दिवाळीचे व वसंताचे खास अंक काढीत असतांना जो त्यांचा अहोरात्र एकसारखा उद्योग चाले, व जी तारांबळ उडे ती पाहिली ह्मणजे त्यांची कींव वाटल्याखेरीज रहात नसे. प्रत्येक महिन्याच्या अंकाचें काम चालू असतांनाच त्यासोबत खास अंकाचें कामहि महिन्यांचे महिने चालत असे. खास अंकाचीं लोकांस प्रिय होतील अशीं विशिष्ट अंगें आधींपासूनच ठरवावयाचीं, अंकांतील विविध विषयांची जुळणी व रचना करावयाची, विद्वान् लेखकांकडून लेख मागवावयाचे, व कुशल चित्रकारांकडून चित्रें काढवून त्यांची योजना व मांडणी करावयाची; या सर्व गोष्टींसंबंधीं विचार करण्याकरितां रात्रीं अकरा बारा वाजेपर्यंत प्रस्तुत लेखकाच्या दिवाणखान्यांत सतत बैठकी होत असत. एकंदरींत 'मनोरंजन' मूळस्वरूपांतून हल्लींच्या स्वरूपांत आणण्याकरितां, दिवाळीचे व वसंताचे खास अंक इंग्रजी मासिकांच्या खास अंकांच्या बरोबरीनें सर्वांगसुंदर बनविण्याकरितां काशीनाथपंतांनीं आपल्या जिवाची, पैशाची किंवा दुसऱ्या कशाचीहि बिलकूल परवा बाळगिली नाहीं; जेवणाखाण्याच्या व इतर बाबतींत नियमितपणा राखिला नाहीं, झोपेचा देखील परवा ठेविली नाहीं. असें भयंकर व्रत आचरून त्यांनीं 'मनोरंजना'चा उत्कर्ष साधिला. 'मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी'च्याद्वारें उत्तम व निर्दोष पुस्तकांचाच फैलाव व्हावा याबद्दल देखील हे फार काळजीपूर्वक व्यवस्था ठेवीत. 'मनोरंजना'चें काम वेळच्यावेळीं छापून मिळत नसल्यामुळें अंक वक्तशीर निघण्यांत फार दिरंगाई होऊं लागली याचें कारण केवळ परावलंबित्व अशी पक्की खात्री झाल्यामुळें काशीनाथपंतांनीं आपला स्वतःचा छापखाना काढण्याचें निश्चित केलें व सर्व तजवीज योग्य प्रकारें झाल्यावर त्यांनीं 'मनोरंजन' छापखाना सुरूहि केला. हा छापखाना आरंभीं केवळ 'मनोरंजना'करितां व उरल्या वेळीं 'मनोरंजकग्रंथप्रसारक मंडळी'चीं पुस्तकें छापण्याकरितां ह्मणून काढिलेला होता; परंतु त्यांच्या अंगच्या वर वर्णिलेल्या अमोलिक गुणांनीं या कामांतहि आपला प्रभाव दाखविल्यामुळें छापखान्याचें काम लवकरच बेसुमार वाढून, तो भरभराटीच्या मार्गास लागला. यामुळें वेळेच्या अभावीं 'मनोरंजना'कडे देखील काशीनाथपंतांचें दुर्लक्ष्य झालें, परंतु शेवटीं या दोन्हीहि संस्था त्यांनीं सुव्यवस्थित स्वरूपांत आणून सोडिल्या. छापखान्यांतील कामगार मंडळीचें यांच्यावर पूर्ण प्रेम असे. १९१८ सालच्या आक्टोबर महिन्यांत त्यांनां जें भयंकर दुखणें झालें त्यांतून सुखरूपपणें पार पडल्यामुळें छापखान्यांतील कामगारमंडळीनें सत्यनारायणाच्या पूजेचा समारंभ मोठ्या थाटानें घडवून आणिला. त्या प्रसंगीं एकंदरींत या कामगारमंडळीचा दिसून आलेला




अनुक्रमणिका



प. वा. का. र. मित्र.  प. वा. बा. रा. कुळकर्णी.



अनुक्रमणिका



श्री. मंगेश सीताराम लाड; प. वा. बाळकृष्ण रामचंद्र कुळकर्णी;
प. वा. का. र. मित्र; प. वा. डॉ मल्हू सुराजी.




अनुक्रमणिका

उत्साह अवर्णनीय होता, व तो सर्व प्रकार पाहून हल्लीं भांडवलवाले व मजूरवर्ग यांजमधील लढ्याचें स्वरूप जें चोहींकडे वाढत्या प्रमाणावर दिवसेंदिवस दिसून येत आहे त्याबद्दल मला फारच आश्चर्य वाटलें. जें प्रेमाचें नातें काशीनाथपंत व त्यांचा कामकरीवर्ग यांजमध्यें मला सर्व प्रसंगीं दिसून येत असे त्यावरून मला असें वाटूं लागलें, कीं, अशाच प्रकारचें नातें जर सर्वत्र या उभय वर्गामध्यें राहील—व तें रहाणें केवळ अशक्य नाहीं—तर लढ्याचें कारण केव्हांच उरणार नाहीं. असो. सत्यनारायणाच्या पूजेच्या प्रसंगीं काशीनाथपंतांस त्यांच्या कामगार मंडळीनें प्रेमपुरःसर जें मानपत्र अर्पण केलें त्यांतील कांहीं मजकूर खालीं दिला आहे. त्यावरून काशीनाथपंत आपल्या कामगार मंडळीस किती व कोणत्या कारणांमुळें प्रिय झाले होते हें स्पष्ट दिसून येईलः—

" परमप्रिय महाराज ! आपण आपला 'मनोरंजन' छापखाना वाढवून तो नमुनेदार छापखाना करण्याचा प्रयत्न करीत आहां. आपल्या ह्या कृतीनें आपल्यासच नव्हे तर आपल्या देशालाहि मोठें भूषण प्राप्त होणार आहे. आपल्या या थोर कार्याबद्दल आपल्या हाताखालीं काम करणाऱ्या आह्मां सर्व मंडळीला अत्यंत अभिमान वाटतो व आपल्या या थोर कार्यांत आपल्याला शक्य ती मदत करण्यास आह्मी सर्व प्रकारें झटूं असें आपल्याला आश्वासन देतों.

" 'प्रेस ॲसोसिएशन' स्थापन करण्यांतहि आपण पुढाकार घेतला आहे याबद्दल आह्माला मोठा आनंद व अभिमान वाटतो. छापखान्यांतील मंडळी व मालक यांच्यामध्यें कांहीं तरी कायमचें नातें राहून उभयतांत अधिकाधिक प्रेम, सलोखा आणि कळकळ उत्पन्न होईल अशी तजवीज झाली पाहिजे. प्रत्येक कारखाना ह्मणजे एकमेकांची काळजी घेणारें एकएक कुटुंब बनलें पाहिजे, व या बाबतींत आपल्या 'मनोरंजन' छापखान्याचें आपण दुसऱ्या छापखान्यांलाच नव्हे तर दुसऱ्या कारखान्यांलाहि उदाहरण घालून द्याल अशी आमची पूर्ण खात्री आहे.

"सन्मान्य शेटसाहेब ! आपण आमच्याशीं जें अत्यंत प्रेमळपणाचें, आस्थेचें व दयाळूपणाचें वर्तन ठेवतां त्याबद्दल आह्मी आपले सदैव ऋणी आहों."

आरंभीं 'मासिक मनोरंजन' व शेवटीं 'मनोरंजन' छापखाना या दोहोंच्या निदिध्यासांत काशीनाथपंत नेहमीं चूर असल्यामुळें जेवणाखाणाचीहि त्यांनां शुद्धि नसे. तोंडांत विडी व मनांत विचार अशा स्थितींत त्यांचीं वर्षेंच्या वर्षें गेलीं. कचेरींत एकेच ठिकाणीं तासांचेतास बसून रहावयाचें—व्यायामाचें नांवहि नाहीं, विश्रांति नाहीं, तेणेंकरून पचनेंद्रियें शिथिल झालीं व एकंदरींत त्यांच्या शरीरप्रकृतीवर अनिष्ट परिणाम घडून आला. रात्रभर झोंप नसल्यामुळें सकाळीं ते उशीरां उठत असत व उठल्यानंतरहि ताजेतवाने क्वचित् दिसत. विचारलें असतां पुष्कळदां ते सांगत " काय करावें हो ! रात्रभर झोंप नाहीं त्यामुळें कसेंसेंच वाटतें. " तथापि त्यांतल्या त्यांत बेतबात साधून त्यांनां आपल्या शरीराची जोपासना करतां येण्यासारखी होती, व तसें करणें अत्यावश्यकहि होतें, कारण " शरीरमाद्यं खलु सर्वसाधनम् ". परंतु आमचें खडतर दुर्दैव, कीं, आमच्यांतील थोर विभूतींनां हें केव्हांहि साध्य होत नाहीं. विलायतेंत थोर विभूति




अनुक्रमणिका

पुष्कळ वर्षे जगून आपलीं लोकसेवेचीं कार्यें अव्याहत चालू ठेवूं शकतात; कारण, त्यांची दृष्टि एककल्ली नसते. शरीर हें सर्व चळवळीस अत्यावश्यक आद्य साधन आहे या गोष्टीची त्यांनां उत्तम जाणीव असते ह्मणून ते अतिमहत्त्वाच्या व बिकट प्रसंगांत देखील नियमितपणा व बेतबात राखण्याची खबरदारी घेतात. ते शरीराची केव्हांहि हेळसांड होऊं देत नाहींत; परंतु आपल्याकडे प्रकार याच्या अगदीं उलट. राष्ट्रकार्यांत गुंतलेलीं आपलीं माणसें, आपण देहधारी आहोंत, आपल्या हातून कांहीं उत्तम देशकार्य व्हावयाचें असेल तर शरीराची हयगय करून बिलकूल चालणार नाहीं वगैरे, महत्त्वाच्या बाबी पार विसरून जातात. त्याचा परिणाम असा होतो, कीं, शरीराचें घोडें लवकरच थकतें व आपली कामगिरी शेवटास नेण्याच्या आधींच ते अकालीं मृत्युमुखीं पडतात, व देशाचें नुकसान करून त्यास आपल्या मरणानें दुःखसागरांत लोटतात. पर्यायानें याची जबाबदारी कांहीं अंशानें तरी आमच्या थोर माणसांवरच येत नाहीं काय ? मी पुष्कळदां ह्मणें "काशीनाथपंत, आपण देहधारी, विदेही स्थिति आपणास उपयोगाची नाहीं. आपल्या सर्व कामांत जेवणाखाणाचा बेतबात नियमितपणा, व्यायाम, व चांगली झोंप हीं राखण्याचा प्रयत्न अवश्य झाला पाहिजे. होतां होईल तों विडीचें व चहाचें भयंकर व्यसनहि कमी झालें पाहिजे, वगैरे, वगैरे." हें सर्व ते कबूल करीत; परंतु 'जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः। जानाम्यधर्मं न च मे निवृत्तिः' कांहींशी अशा प्रकारची त्यांची शेवटीं निराशाची स्थिति होत असे. या सर्वांचा परिणाम त्यांच्या अकालीं निधनांत झाला ही फार दुःखाची गोष्ट होय.

आपला अंतकाल समीप आला आहे ही जाणीव त्यांनां मरणाच्या आधीं बरेच दिवस झाली होती; तथापि त्यांनां मृत्यूचें यत्किंचित्‌हि भय वाटलें नाहीं. कारण, ईश्वरास साक्षी ठेवून आपलें ऐहिक कर्तव्य आपण शक्य तितक्या उत्तम प्रकारें बजाविलें आहे अशी त्यांनां पूर्ण खात्री वाटत होती. शेवटपर्यंत आपण उभारिलेल्या सर्व संस्था आपल्या पश्चात् उत्तम प्रकारें चालून भरभराटीस याव्या अशाबद्दलची सर्व व्यवस्था नीट लावून त्यांनीं ईश्वरावर पूर्ण निष्ठा ठेवून आपला देह समाधानवृत्तींत शान्तपणें ठेविला व परलोकीं गमन केलें.

काशीनाथपंतांनीं आपलें कर्तव्य उत्तम प्रकारें बजाविलें, परंतु त्यांनीं केलेल्या महाराष्ट्राच्या सेवेबद्दल आपण त्यांचे उतराई होण्याचें आपलें कर्तव्य आतां उरलें आहे. अर्थात् त्यांनीं आपल्या मागें ठेविलेल्या अमोलिक संस्थांची नीट जोपासना करून त्यांची उत्तरोत्तर भरभराट होईल अशा तजविजीस आपण लागलें पाहिजे. हेंच आपलें कर्तव्य होय व तें बजाविण्यास आपण नेहमीं सिद्ध असलें पाहिजे ह्मणजेच आपण त्यांनीं केलेल्या सेवेचें योग्य चीज केल्यासारखें होणार आहे. 'सत्य संकल्पाचा दाता नारायण' प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या मनांत काशीनाथपंतांनीं आतांपर्यंत केलेली महाराष्ट्राची कामगिरी नेटानें पुढें चालविण्यास साहाय्यभूत होण्याची प्रेरणा करो, हीच त्याजपाशीं प्रार्थना आहे.

---



अनुक्रमणिका

२

## लेखक—श्री. दिनकर सखाराम वर्दे, बी. ए., एलूएल्. बी.

'अरे रे ! मित्र गेले, फार वाईट झालें' असे उद्गार प्रत्येक सुशिक्षित महाराष्ट्र कुटुंबांत, काशीनाथपंतांच्या निधनाची वार्ता ऐकून निघाले असतील, ह्यांत संशय नाहीं. गेल्या पंचवीस वर्षांत मुख्यत्वेंकरून मनोरंजनाच्या द्वारें महाराष्ट्रांतील बहुतेक सर्व सुशिक्षित कुटुंबांशीं त्यांचा परिचय अगदीं आप्ताप्रमाणें झालेला होता. त्यांच्या अंतःकरणांत व विचारांत महाराष्ट्रास नेहमीं प्रमुख स्थान असे. फार काय त्यांचें अंतःकरण महाराष्ट्रमय झालें होतें असें ह्मटलें तरी चालेल. ह्या त्यांच्या अंतःकरणाचें प्रतिबिंब मनोरंजनाचे कोणत्याहि वर्षाचे अंक पाहिल्यास त्यांत जागोजाग दिसल्याशिवाय राहणार नाहीं. मनोरंजन निघाल्यापासून आज सतत पंचवीस वर्षांत आपण करतों हें काम महाराष्ट्रासाठीं आहे, इतकेंच नव्हे, तर हें काम महाराष्ट्राचें आहे, ही जाणीव त्यांच्या मनांत नेहमीं वागत असे. उलटपक्षीं महाराष्ट्रासहि त्यांच्यासंबंधानें आप्तपणा वाटत असे. अर्थात् ह्या दोघांमधील एकमेकांच्या प्रेमाचें द्योतक मनोरंजन हें बहुतेक सर्व सुशिक्षित महाराष्ट्र कुटुंबांत जात असल्यामुळें ह्या प्रेमाची वृद्धि वर्षोवर्षीं होत जाऊन आह्मीं वर लिहिल्याप्रमाणें उद्गार महाराष्ट्रांत जिकडेतिकडे ऐकूं आल्यास त्यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं; परंतु वेंगुर्ल्यासारख्या तालुक्याच्या गांवांत मराठी सहाव्या इयत्तेच्या शिक्षणाच्या सामुग्रीनें दरमहा सहासात रुपये मिळवणाऱ्या मराठी शिक्षकानें आपल्या पंचवीस वर्षांच्या मेहनतीनें महाराष्ट्राचें इतकें प्रेम संपादन करावें व आपल्या मरणानें त्याला हळहळ वाटण्यास लावावें हें मोठेंच आश्चर्य आहे. अगदीं आरंभाचें मनोरंजनाचें स्वरूप व अलीकडील स्वरूप हीं पाहिलीं ह्मणजे त्याच्या वाढत्या व उत्तरोत्तर सतेज व सुंदर स्वरूपास अवश्य असलेली सामुग्री ह्मणजे त्याच्या जनकाच्या शिक्षणाची व विचारांची प्रगति, ही संपादन करण्याच्या कामीं काशीनाथपंतांनीं किती मेहनत केली असेल हा विचार कोणाचेंहि अंतःकरण आश्चर्यानें थक्क केल्याशिवाय राहणार नाहीं. त्यांनीं इंग्रजी भाषेचें बरेंच ज्ञान संपादन केलें होतें. शिवाय बंगाली भाषेंत व गुजरातींत त्यांनीं त्या भाषेंतील पुस्तकें वाचतां येण्याइतका प्रवेश करून घेतला होता. मनोरंजनाच्या आरंभींच्या वर्षांच्या दगदगींतच त्यांच्या 'धाकट्या सूनबाईनें' मराठी वाङ्मयांत प्रवेश करून काशीनाथपंतांच्या बंगालीभाषेच्या ज्ञानाची साक्ष पटविली. त्याचप्रमाणें गुजराती वाङ्मयोद्यानांतील उत्तम फुलांचा सुवास मनोरंजनाच्या व त्यांनीं इतर प्रसिद्ध केलेल्या पुस्तकांच्या द्वारें मराठी वाङ्मयांत पसरून दिलेला आहे. कोणतें तरी उच्च व सर्वगामी ध्येय पुढें असल्याशिवाय इतका नेटाचा व निश्चयाचा उद्योग कोणाच्याहि हातून होत नसतो. मित्रांचा उद्योग व सेवा महाराष्ट्रास पसंत पडली, व त्यांच्या योगानें महाराष्ट्रीयांचें त्यांच्यावर इतकें प्रेम जडलें तर अर्थात् महाराष्ट्रसमाजाच्या प्रगतीस त्यांच्या परिश्रमानें चांगलें साहाय्य केलें असलें पाहिजे. तसें नसल्यास महाराष्ट्र व मित्र ह्यांचा इतका अन्योन्य प्रेमसंबंध जमून येणें शक्य दिसत नाहीं.

काशीनाथपंतांचे विचार नेहमीं प्रगतिपर असत. त्यामुळें कोणत्याहि परिस्थितींत मनोरंजनाचें सामाजिक सुधारणेचें ध्येय केव्हांहि सुटलें नाहीं. इतकेंच नव्हे तर सामाजिक प्रगतीच्या




अनुक्रमणिका

मार्गावर मनोरंजनाचें पाऊल नेहमीं पुढेंच आहे. केवळ मराठी सहावी इयत्ता पास झालेल्या तरुण इसमानें अत्यंत गरिबीच्या स्थितींत पंचवीस वर्षांपूर्वी मुंबईसारख्या शहरांत येऊन सुधारकी मताचें मासिक पुस्तक सुरू करावें हें केवढेंतरी साहस होय हें कोणीहि सांगेल. या साहसावरून काशीनाथपंतांचें ऐन तारुण्यांतील विचारस्वातंत्र्य व त्यांचा आत्मविश्वास हीं चांगलींच व्यक्त होतात. यावरून त्यांचे विचार त्यांच्या सहाव्या इयत्तेच्या परीक्षेच्या सीमेपलीकडे कितीतरी गेले होते हें उघड आहे. त्या वेळचें महाराष्ट्राचें वातावरण फार क्षुब्ध झालें होतें, व परलोकवासी आगरकरांच्या जोमदार लेखणींतून, भारती वीर अर्जुनाच्या धनुष्यांतून जसे बाण तीव्र वेगानें दूरवर जात त्याप्रमाणें, सामाजिक सुधारणेचे विचार दूरवर व मोठ्या जोरानें पसरत होते. वेंगुर्लें शहर, आज तसें तेव्हांहि, सामाजिक व राजकीय चळवळीच्या परिघाच्या बाहेर नव्हतें. अर्थात् केसरी व सुधारक यांतील परस्परविरुद्ध विचारांनीं महाराष्ट्रांतील इतर भागांप्रमाणें तेथीलहि वातावरण क्षुब्ध झालेलें होतें. त्या वेळच्या सुधारणावादाचा परिणाम इतर तरुणांप्रमाणें आमच्या काशीनाथपंतांच्याहि मनावर झालेला होता, व त्याच वातावरणांतील स्फूर्तीनें त्यांनीं आपला उद्योग मुंबईस येऊन सुरू केला. ज्या स्फूर्तीनें त्यांनीं उद्योग सुरू केला तीच स्फूर्ति अखेरपर्यंत कायम राहिली. ज्या विचारांनां परलोकवासी आगरकरांनीं चालन दिलें त्याच विचारांच्या दिशेनें परलोकवासी गोपाळराव गोखले, प्रो. कर्वे, प्रिं. परांजपे इत्यादि महाराष्ट्र पुढाऱ्यांनीं सुरू केलेल्या व चालविलेल्या संस्था आज काम करीत आहेत. महाराष्ट्राच्या सामाजिक सुधारणेच्या इतिहासांत काशीनाथपंतांच्या मासिक मनोरंजनानेंहि स्थान मिळविलेलें आहे व त्याचमुळें मनोरंजन व मित्र महाराष्ट्राचे आवडते झाले आहेत.

परलोकवासी विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या जाज्वल्य लेखांनीं महाराष्ट्राच्या मनांत तीव्र देशाभिमान बाणवला यांत जसा संशय नाहीं, त्याचप्रमाणें साधारण समाजांत "आम्ही श्रेष्ठ, आमचा धर्म श्रेष्ठ, आमचीं शास्त्रें, पुराणें, इतिहास, रीतीभाती, रूढि वगैरे आमच्यांत पूर्वपरंपरेनें जें चालत आलें आहे तें सर्व चांगलें, त्यांत फेरबदल करण्याचें अगर कोणाकडून कांहीं शिकण्याचें अगर घेण्याचें असें कांहीं नाहीं" ह्या मतास पूर्ण प्रोत्साहन मिळालें. खऱ्या देशाभिमानाची ही दिशा नव्हे. समाजांतील कांहीं विचारी आणि सुशिक्षित लोकांच्या लक्षांत ही दिशाभूल येऊन या आंधळ्या देशाभिमानाच्या भरीस पडून सर्व समाज दुर्गतीच्या खड्ड्यांत पडेल असें त्यास वाटलें. या गतानुगतिकत्वाच्या दुरभिमानास तोंड देण्याच्या कामीं परलोकवासी आगरकर आणि गोखले यांनीं कंबर बांधली आणि 'सुधारक' पत्र सुरू केलें. पुराणमतवाद्यांच्या अभेद्य मानलेल्या किल्ल्यावर सर्व बाजूंनीं अत्यंत जोराचा मारा सुरू केला. विचाराच्या कसोटीस उतरेल तेंच कायम व समाजास हितकर; त्यावांचून इतर सर्व फोल व अहितकारी असल्यामुळें त्याग करण्यास सर्वस्वी पात्र हें मत आगरकरांच्या लेखांनीं समाजांत जोरानें पसरलें. आगरकरांचा स्वार्थत्याग, त्यांची संन्यास वृत्ति, त्यांचें थोर चारित्र्य, त्यांची विद्वत्ता, व सर्वांत श्रेष्ठ ह्मणजे त्यांची खरी तेजस्वी स्वदेशप्रीति व आपल्या समाजाविषयीं तीव्र कळकळ या श्रेष्ठ सद्गुणांचा पाठिंबा त्यांच्या लेखणीस असल्यामुळें त्यांच्या लेखांनीं तरुण पिढीच्या मनावर चांगला व योग्य परिणाम केला. सुधारकाच्या सरळ, ताठ व शुद्ध विचारपद्धतीचा प्रकाश





अनुक्रमणिका

सर्वत्र पडल्यामुळें या पद्धतीचे अभिमानी जिकडेतिकडे दिसूं लागले, व समाजांत नवी चेतना प्रादुर्भूत झाली. आगरकरांनीं जणूं काय नवीन महाराष्ट्र अस्तित्वांत आणिला. या पुण्यात्म्यानें आपल्या दहा वर्षांच्या सतत प्रयत्नानें व खऱ्या कळकळीनें आपल्या समाजबंधूंस गतानुगतिकत्वाच्या गाढ अंधारांतून वाट दाखविण्यासाठीं जी मशाल पेटविली तिच्या प्रकाशांत तरुण महाराष्ट्राचे पुढारी आपापल्या कार्यक्षेत्रांत प्रगतीच्या मार्गानें काम करीत आहेत.

प्रिं. आगरकरांसारखे पुरुष एकामागून एक असे कोणत्याहि देशांत निपजत नसतात. एखाद्या खंद्या वीरानें मोठमोठ्या लढाया मारून प्रांत काबीज केल्यानंतर नवीन परिस्थितीस अनुसरून त्या प्रांतांत स्थिरस्थावर करून संपादिलेल्या विजयाचे परिणाम टिकाऊ व सुपरिणामी करावयास ज्याप्रमाणें मुत्सद्दी लोकांस निराळ्या दिशेनें शांतता स्थापित करून काम करावें लागतें, त्याप्रमाणें आगरकरांच्या मागें त्यांच्या कामाचे परिणाम टिकाऊ व समाजास सर्व बाजूंनीं फलदायी करण्यास समाजांत शिक्षणाचा, मुख्यत्वेंकरून स्त्रीशिक्षणाचा प्रसार करण्याची जबाबदारी तरुण महाराष्ट्रावर व त्याच्या पुढाऱ्यांवर येऊन पडली. प.वा. गोखल्यांनीं स्थापन केलेल्या 'भारतसेवक मंडळा'नें स्त्रीशिक्षण व समाजशिक्षण यांचा आपल्या कार्यक्षेत्रांत अंतर्भाव करून त्या दिशेनें त्यांचे प्रयत्न जागोजाग चालले आहेत. परलोकवासी आगरकर आणि गोखले यांनीं दिलेल्या स्फूर्तीनें डेक्कन एज्युकेशन सोसायटीचें काम सालोसाल वाढत्या प्रमाणावर त्यांचे सच्छिष्य प्रिन्सिपाल परांजपे आणि त्यांचें सहायकारी मंडळ यांनीं चालविलें आहे. प्रो. कर्वे यांनीं स्त्रीशिक्षणाचा वेलविस्तार इतका वाढविला आहे, कीं, त्यांच्या कामाचें आजचें स्वरूप आरंभीं कोणाच्याहि कल्पनेंत आलें नसावें. चांगल्या रीतीनें चालविलेलीं दैनिकें अगर साप्ताहिक पत्रें व मासिकें यांच्या साधनानें मिळणाऱ्या शिक्षणाची व्याप्ति शाळा व कॉलेजें यांच्यापेक्षांहि ज्यास्त असते. कादंबऱ्या, नाटकें वगैरे वाङ्मय हेंहि लोकशिक्षणाचें महत्त्वाचें साधन आहे. अलीकडील पंचवीस वर्षांत निर्माण झालेलें मराठी वाङ्मय बरेंचसें सामाजिक सुधारणेच्या ध्येयदृष्टीनें प्रसिद्ध झालेलें आहे. प. वा. हरिभाऊ आपट्यांच्या कादंबऱ्या, श्रीयुत कोल्हटकरांचीं नाटकें त्याचप्रमाणें श्रीयुत केळकर, वरेरकर व प. वा. गडकरी यांच्या कृति सामाजिक सुधारणेच्या ध्येयाकडे लक्ष्य ठेवून झालेल्या आहेत.

धर्माच्या मागें राहून बळावलेल्या घातुक रूढींस व आचारांस परलोकवासी आगरकरांनीं पुढें खेंचून उजेडांत आणिलें व त्यांचें घातुक व विकृत स्वरूप समाजास स्पष्ट दाखविलें. परकीयांच्या संस्कृति तेवढ्या सर्व अपवित्र अतएव त्याज्य हा समज पिटाळून लाविला. आपल्या संस्कृतींत जें चांगलें तेंच सनातन अर्थात् सुसंग्राह्य. जगांतील इतर संस्कृतींत जें चांगलें असेल तें परकीयांचें म्हणूनच त्याचा तिरस्कार न करितां त्याचा आपल्या संस्कृतींत संग्रह करून त्याच्या योगानें आपली संस्कृति सर्वांगसुंदर करून तिच्या योगानें आपल्या समाजांतील स्त्रीपुरुषांस आपलीं सर्व कर्तव्यें उत्तम रीतीनें बजावतां येतील व आपल्या राष्ट्रास साऱ्या जगांत पहिलें स्थान मिळेल अशा दृष्टीनें काम करणें हाच खऱ्या सामाजिक अगर राष्ट्रीय सुधारणेचा योग्य व अमोघ फलदायी मार्ग होय. काशीनाथपंतांचें हें ध्येय त्यांच्या दृष्टीपुढून कधींहि ढळलें नाहीं. स्त्रीशिक्षण,





अनुक्रमणिका

जातिभेदनिर्मूलन, पतितपरावर्तन, अस्पृश्योद्धार, प्रौढ विवाह, इत्यादि महत्त्वाच्या सामाजिक विषयांस पोषक अशा वाङ्मयाचा प्रवाह त्यांनीं आपल्या मनोरंजनाच्या व त्यांनीं लिहिलेल्या व प्रसिद्ध केलेल्या इतर पुस्तकांच्या द्वारें आज पंचवीस वर्षें अव्याहत चालू ठेवलेला होता. त्यांनीं महाराष्ट्रावरच्या आपल्या निःसीम भक्तीनें व त्याच्या प्रगतिप्रीत्यर्थ चालविलेल्या एकसारख्या परिश्रमानें तरुण महाराष्ट्राच्या पुढारी वर्गात स्थान मिळविलें. महाराष्ट्रांत मनोरंजनाइतकें लोकप्रिय दुसरें मासिक नाहीं. तरुण महाराष्ट्रांतील प्रगतिपर विचारांस सतत प्रोत्साहन देणारें मासिक मनोरंजनासारखें दुसरें साधन नसल्यामुळें या प्रगतीचें बरेंचसें श्रेय मनोरंजन व काशीनाथपंत यांच्याकडे येतें. अर्थात् महाराष्ट्राचें मनोरंजन व मनोरंजनाचा महाराष्ट्र हा संबंध आज बरींच वर्षें चालू आहे. काशीनाथपंतांच्या अभावीं मनोरंजनाची सर्व जबाबदारी तरुण महाराष्ट्रावर पडलेली आहे. ही जबाबदारी तरुण महाराष्ट्र पार पाडील व काशीनाथपंताचें स्मरण महाराष्ट्राच्या पुढील पिढ्यांत जागृत ठेवील असा पूर्ण भरंवसा आहे.

---

३.

लेखक—श्रीयुत द्वारकानाथ गोविंद वैद्य, संपादक—सुबोधपत्रिका.

असाधारण बुद्धिसामर्थ्य, अलोट संपत्ति, प्रशंसनीय ज्ञानसंग्रह व निकोप शरीरप्रकृति अशा साधनांनीं सज्ज असलेल्या माणसाच्या हातून विशेष कार्य झालें, तर त्यांत नवल काय ? परंतु आज ज्यांच्या वियोगानें सगळा महाराष्ट्र हळहळत आहे त्या काशीनाथपंतांनां ह्या तिन्ही चारहि गोष्टींची अनुकूलता नव्हती. साधारणपणें मारवाडी लोक आपला देश सोडून पैसा मिळविण्यासाठीं परदेशीं एक लोटा व दोरी घेऊन कसे येतात याचें एक चित्र कित्येक वर्षांपूर्वीं मनोरंजनामध्यें आलें आहे, त्याप्रमाणें आपली जन्मभूमि—वेंगुर्लें—सोडून काशीनाथपंत मुंबईस आले व इतर कोणाचेंहि ह्मणण्यासारखें साहाय्य नसतां आजच्या पदास चढले. हें कांहीं यदृच्छेनें झालें नाहीं. मुंबईसारख्या अफाट शहरीं येऊन काशीनाथपंतांसारखी कीर्ति मिळविणें ही कांहीं साधारण गोष्ट नव्हे. रा. खंडेराव भिकाजी वेलसरे यांनीं चांगल्या पगाराची सरकारी नोकरी सोडली व २५–२६ वर्षांपूर्वीं प्रभाकर वर्तमानपत्र व छापखाना हीं विकत घेतलीं. प्रभाकर पत्रासाठीं काशीनाथपंतांनां रा. वेलसरे यांनीं रिपोर्ट वगैरे लिहिण्यासाठीं ठेविलें. प्रभाकर आफिसामध्यें माझी व काशीनाथपंतांची प्रथम ओळख झाली तेव्हांपासून शेवटपर्यंत माझा व काशीनाथपंतांचा अकृत्रिम स्नेह राहिला. आमच्या शेजारीं राहत असतांना त्यांनीं गृहस्थाश्रम पत्करला; आमच्या देखत त्यांनीं मनोरंजनाचा रोपा लाविला; तो रोपा कसा जगला, कसा वाढीस लागला, त्याचा मोठा वृक्ष कसा झाला, त्याची छाया दूरवर कशी पसरली, हें सर्व आह्मी पहात असतां काशीनाथपंतांस हा लोक सोडून जावें लागलें. त्यांच्या हातून महत्कार्य झालें हें त्यांच्याशीं अप्रेमाच्या भावानें वागणारांसहि कबूल करावें लागेल. हें सर्व कार्य काळवेळ जमून आला ह्मणून झालें असें ह्मणून रा. मित्रांची योग्यता कमी करण्याचा प्रयत्न कोणीं केला तरीसुद्धां रा. मित्रांनीं आपल्या रक्ताचें पाणी करून काढलेल्या मनोरंजनाच्या विशेष अंकांतील प्रत्येक



पृष्ठ व प्रत्येक चित्र 'हें खोटें आहे, हें खोटें आहे' असें सांगावयास तयार होईल ! काशीनाथपंतांच्या ठायीं कांहीं विशेष गुण होते, ह्मणूनच त्यांस इतकें यश आलें असें आह्मांस वाटतें. तरुण महाराष्ट्र त्या गुणांची ओळख करून घेईल तर तें त्यांस कल्याणप्रद झाल्यावांचून राहणार नाहीं.

पंचवीस वर्षांच्या परिचयामध्यें काशीनाथपंतांचा जो एक विशेष गुण प्रथमपासून आमच्या अनुभवास येत गेला तो त्यांचा विनम्र स्वभाव. आपल्या सौम्यपणाच्या जोरावर त्यांनीं महाराष्ट्र आपलेंसें केलें. आपल्या नम्रतेच्या बलावर, आपल्या विनयशील वर्तनाच्या साहाय्यानें त्यांनीं मनोरंजनाची लोकप्रियता वाढविली. योजनासामर्थ्य असलें तरीसुद्धां त्याचा उपयोग करण्याची संधिच आली नाहीं तर तें सामर्थ्य करपून जावयाचें ! आपल्या मधुर स्वभावानें त्यांनीं लोकांस जिंकिलें. महाराष्ट्रांतील नांवाजलेले लेखक, प्रतिभासंपन्न कवि त्यांचे मित्र झाले; अनेक पदव्यांनीं भूषित झालेलीं माणसें त्यांचे साहाय्यक बनले व मनोरंजन महाराष्ट्राचें आवडतें मासिक झालें. ते कोणाशींहि उद्दामपणें वागले नाहींत; त्यामुळें ते सर्वांनां हवेसे वाटत. त्यांच्या ठिकाणीं स्वीकृत कार्याविषयीं जी तळमळ असे ती महाराष्ट्रांतील संपादकांमध्यें दिसत नाहीं. मनोरंजन आपल्या संसाराचा गाडा चालविणारें साधन व्हावें ही त्यांची इच्छा नव्हती, असें ह्मणतां यावयाचें नाहीं; परंतु मनोरंजन प्रत्येक कुटुंबाचें आवडतें मासिक व्हावें, मनोरंजनाच्या द्वारें आपल्या मातृभाषेची अप्रतिम सेवा व्हावी, महाराष्ट्रास ललामभूत ठरणारीं पुस्तकें आपल्या हातून प्रसिद्ध व्हावीं ही त्यांची तळमळ त्यांस स्वस्थ बसूं देत नसे. ही तळमळ केवळ स्वार्थपर होती असें ह्मणून काशीनाथपंतांचा उपमर्द करण्यास मी केव्हांहि तयार होणार नाहीं. त्यांनीं प्रसिद्ध केलेला ग्रंथसंग्रह पहा. सर्व पुस्तकें केवळ स्वार्थबुद्धीनें त्यांनीं प्रसिद्ध केलीं असें कधींहि ह्मणतां यावयाचें नाहीं. कित्येक ग्रंथ आज लोकांनां रुचावयाचे नाहींत असें पक्कें जाणून त्या त्या ग्रंथाची लोकांमध्यें गोडी उत्पन्न करण्यासाठीं त्यांनीं कित्येक ग्रंथ प्रसिद्ध केलेले मला माहीत आहेत. हें सर्व महाराष्ट्रभाषेची अल्पस्वल्प सेवा यथाशक्ति व्हावी या हेतूनें त्यांनीं केलें यांत कांहीं संशय नाहीं.

काशीनाथपंतांनीं एक विशेष गोष्ट नित्य आपल्या दृष्टीपुढें ठेविली होती ती अशी, कीं, महाराष्ट्रीय स्त्रियांची उन्नति जोंपर्यंत होत नाहीं तोंपर्यंत देशसुधारणेच्या सर्व गप्पा व्यर्थ होत. यासाठीं आपल्या भगिनीवर्गाच्या उन्नतीसाठीं ते अहर्निश झटले. स्त्रियांचा उपमर्द करणारा, स्त्रियांविषयीं हीनत्व दर्शविणारा, स्त्रियांनां मागें टाकणारा कितीहि उत्तम लेख असला तरी त्यांनीं त्याला वेधडक केराची टोपली दाखवावी ! स्त्रीदाक्षिण्य त्यांच्या रोमरोमामध्यें मुरलेलें होतें असा माझा अनुभव आहे. स्त्रियांस उपयुक्त, स्त्रियांस बोधपर असे लेख मिळविण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न ज्यांस माहीत आहेत त्यांस त्यांची स्त्रियांच्या उन्नतीविषयींची तळमळ किती तीव्र होती त्याची कल्पना होण्यासारखी आहे. मित्रांचा धिमा स्वभाव त्यांचें सामर्थ्य वाढविण्यास कारण झाला. लेख लिहिणारे, काव्य ह्मणून ओळीला ओळ जुळविणारे, नवलकथा रचणारे, विनोदात्मक लेखांची रास तयार करणारे—सर्वच जरी नाहींत तरी त्यांतील पुष्कळसे बरेच अधिरे असतात. कोणास आपल्या सामर्थ्याचा व आपल्या लेखाचा इतका अभिमान असतो, कीं, त्यांचे लेख



प्रसिद्ध झाल्यानंतर त्यांत कांहीं थोडा फेरबदल केलेला असला तर त्यांच्या पायाची तिडीक मस्तकीं पोंचते ! एकदां असेच एक दीर्घकोपी गृहस्थ आपल्या लेखाची छाटाछाट झाल्याबद्दल काशीनाथपंतांची संभावना करीत होते. मित्रांनीं त्यांचें ह्मणणें सर्व ऐकून घेतलें व आपल्या आवडत्या विडीचा धूर टाकीतटाकीत त्यांनां ह्मटलें "संसारामध्यें हा असा अनुभव नित्य येतच आहे. मग असा त्रागा करून काय फायदा ? घरीं जाऊन आपला मूळ लेख व प्रसिद्ध झालेला लेख पुनः एकदां लक्ष्यपूर्वक वाचा ह्मणजे आपला राग शांत झाल्यावांचून राहणार नाहीं." ते गृहस्थ गेल्यावर मित्र ह्मणाले "अश्लील भाषा व अनुदार विचार यांचा मक्ता आपल्या प्रतिपक्षासच देणाऱ्या या गृहस्थांशीं वाद किती घालावयाचा ?"

काशीनाथपंतांच्या एका विशेष गुणाची महाराष्ट्राला अद्याप चांगली ओळख पटलेली नाहीं. हा गुण ह्मणजे परमेश्वरावरील त्यांचा दृढ भरंवसा. आपलें सामर्थ्य अल्प आहे, आपल्या ज्ञानाचा सांठा अल्प आहे, आपलें द्रव्यसामर्थ्य अल्प आहे, आपलें लेखनसामर्थ्य अमुकच दिशेचें आहे या सर्वांची जाणीव त्यांच्या ठिकाणीं होती; ती रात्रंदिवस होती व असें असून त्यांच्या हातून इतकें मोठें कार्य झालें. हें सामर्थ्य त्यांस परमेश्वरानें दिलें व हा सर्व परमेश्वराचा प्रसाद आहे याचीहि जाणीव त्यांच्या ठिकाणीं होती. ज्या वेळीं आपल्या आयुष्याची त्यांस बिलकुल आशा राहिली नव्हती, लवकरच पोरकीं होणारीं लहानलहान मुलें–एकाहून एक लहान अशा त्या मुली–त्यांच्याभोंवतीं पसरलेलीं त्यांनां दिसत होतीं, त्या वेळीं ते एकदां ह्मणाले "मी देवाला विसरून वागण्याचा केव्हांहि प्रयत्न केला नाहीं; जाणूनबुजून कोणाचें अकल्याण केलें नाहीं; आजपर्यंत माझ्या परमेश्वरानें माझा व माझ्या मुलांचा योगक्षेम चालविला, तो मला जो मार्ग दाखवीत गेला त्या मार्गानें मी गेलों, आतां माझ्या मुलांबद्दल या हल्लींच्या स्थितींत मी किती काळजी वाहाणार ? परमेश्वरच त्यांचा रक्षक आहे, परमेश्वरच त्यांचा परमपिता आहे. मी त्यांच्यासंबंधानें अगदीं निर्धास्त आहें." त्यांचा परमेश्वरावर दृढ विश्वास होता ह्मणूनच अखेरपर्यंत त्यांची शांति ढळली नाहीं. व आपरेशनच्या दिवशींहि पहाटेस परमेश्वराचे आभार मानून आपलें चित्त अगदीं शांत व समाहित आहे असें त्यांनीं म्हटलें.

महाराष्ट्रांतील तरुणांनीं काशीनाथपंतांच्या अनेक गुणांची ओळख करून घेतांना त्यांचा आणखी एक गुण लक्ष्यांत ठेवावा. काशीनाथपंत जितके मेणाहून मऊ होते तितकेच ते करारी स्वभावाचे होते. त्याचप्रमाणें एकदां कार्य हातीं घेतलें व तें झालेंच पाहिजे असें त्यांच्या मनानें घेतलें, कीं, तें करून दाखविल्यावांचून त्यांनां स्वास्थ्य नसे. हा निर्धाराचा बाणेदारपणा, त्यांची उद्यमशीलता, त्यांचा बालस्वभाव, त्यांचें आदरयुक्त बोलणें, त्यांचा विनय, त्यांची स्त्रियांच्या कल्याणाविषयींची तळमळ, त्यांची कल्पकता, त्यांचा साधेपणा, त्यांची दीनांविषयींची वत्सलता, व त्यांचें शुद्ध वर्तन या सर्वांचें उगमस्थान त्यांचा परमेश्वरावरील दृढ विश्वास हें होय. हा विश्वास काशीनाथपंतांच्या ठिकाणीं नसता तर परिस्थितीशीं झगडण्याचें सामर्थ्य त्यांस आलें नसतें; हा विश्वास नसता तर कर्तृत्व इतकें वाढलें नसतें; हा विश्वास नसता तर प्रतिकूल स्थिति प्राप्त झाली त्या त्या वेळीं हतवीर्य होऊन ते अधोगतीच्या मार्गास लागले असते. आज महाराष्ट्राला विद्वानांची गरज आहे, धनवानांची जरूर आहे, पण काशीनाथपंत मित्रांसारख्या गरिबी पाहिलेल्या,





अनुक्रमणिका

प्रो. ह. गो. लिमये, एम्. ए.

प्रो. के. रा. कानिटकर, एम्. ए.

प्रो. पं. का. तेलंग, एम्. ए.

श्री. प्र. अ. माळवे, एम्. ए.

प्रो. व. बा. लड्डू, एम्. ए.

श्री. कु. कृष्णाबाई ठाकूर, एम्. ए.

मनोरंजनाचे कांहीं लेखक.



अनुक्रमणिका

संकटें सोसलेल्या, विनयसंपन्न, कर्त्या व उदार माणसांची फारफार जरूरी आहे. शेवटीं मित्रांचें चरित्र व त्यांचें कार्य स्फूर्तिकारक वाटून त्यांचें कार्य पुढें चालविण्यास अनेक तरुण सिद्ध होवोत व महाराष्ट्र त्यांच्या सेवेची कदर अधिकाधिक जाणो अशी परमेश्वरापाशीं प्रार्थना करितों.

---

४

## लेखिका—सौ. राधाबाई गोखले.

प्रत्येक मनुष्याला व विशेषेंकरून आह्मां स्त्रियांपैकीं बहुतेक स्त्रियांनां तरी नेहमीं ह्या जगांतील अनेक दुःखदायक प्रसंग डोळ्यांनीं पाहून, व कानांनीं ऐकून असें वाटत असतें, कीं, ह्या सर्व गोष्टी डोळयांसमोरून बाजूला सारून व प्रपंचांतील रोजच्या अनेक दगदगींतून जो काय आपणाला थोडा फुरसतीचा वेळ मिळेल त्या वेळांत तरी, आपण आपल्या मनाला चांगली करमणूक होऊन आनंद वाटेल असें कांहीं तरी वाचावें, अगर लिहावें; कारण ती आपल्या हातची गोष्ट आहे. आपण वाचण्याकरितां चांगलेंच पुस्तक घेतलें अथवा लिहिण्यासहि आनंदाचाच विषय घेतला ह्मणजे झालें. पण छे, आपणाला वाटत असतें तितकें हें कुठें आपल्या हातचें असतें ? आणि ह्या नियमाला अनुसरूनच, परवां संध्याकाळीं आमच्या अगदीं ध्यानीं-मनींहि नसतां, आह्मांला दैनिक ज्ञानप्रकाशामध्यें श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र यांची शोकदायक निधनवार्ता वाचणें भाग पडलें, आणि आतां आह्मां स्त्रियांवर झालेल्या श्रीयुत मित्रांच्या अगणित उपकारांबद्दल थोडेंतरी ऋणमुक्त होण्याकरितां, हात धजत नाहीं तरी, मन घट्ट करून चार शब्द लिहिणेंहि प्राप्त झालें आहे.

आमचे प्रेमळ बंधु श्रीयुत काशीनाथपंत मित्र यांच्या अकालिक मृत्यूमुळें जर कोणाचा जास्त तोटा झाला असेल तर तो आह्मां सर्व स्त्रीवर्गाचा होय. आज पाव शतक श्रीयुत मित्रांनीं केलेल्या खडतर अशा समाजसेवेबद्दल सर्व समाज तर ह्या शोकदायक वार्तेनें व्याकुळ होईलच, पण आह्मांला जसा हा चटका भोंवेल त्याहून इतरांनां कमीच भोंवेल.

आह्मां सर्व स्त्रीवर्गामध्यें जर पाहिलें तर बहुतेकींनां सख्खे भाऊ दोनदोन चारचार सुद्धां असतील. पण त्यांपैकीं शेंकडा दहा, नव्हे, पांच तरी बंधु आपल्या पाठीला पाठ लावून आलेल्या बहिणीबद्दल श्रीयुत काशीनाथपंत मित्र या बंधूच्या चतुर्थांश तरी कळकळ बाळगणारे सांपडतील काय ? छे, कठीणच! मग आपल्या देशांतील सर्व स्त्रियांनां आपल्या बहिणी समजून, रात्रंदिवस त्यांच्या अनेक अडचणी डोळ्यांपुढें ठेवून, फक्त पाव शतकच नव्हे तर, आपलें सर्व आयुष्य खर्चीं घालणारा काशीनाथपंत मित्र या बंधूसारखा बंधु सांपडणें विरळाच !

श्रीयुत काशीनाथपंत यांची व माझी तशी प्रत्यक्ष बोलण्याची वगैरे मुळींच ओळख नव्हती. त्यांच्या प्रत्यक्ष दर्शनाचा लाभ मला फक्त एकदां १९१५ सालीं मुंबईस 'महाराष्ट्र साहित्य-संमेलन' भरलें होतें तेव्हां, मी मुम्बईस गेलें, तेव्हांच काय तो झाला. पण त्यांचें प्रिय अपत्य जें, 'मासिक मनोरंजन' त्याच्या करवीं अलीकडे पंधरा वर्षें दर महिन्याला त्यांच्याशींच जणुं काय आपण बोलत आहों इतका परिचय व संघटन यांच्याबद्दल वाटूं लागलें होतें. शिवाय





माझे प्रिय पति यांचा लेखनव्यवसायामुळें श्रीयुत मित्र यांच्याशीं बराच दृढ परिचय होता. त्याकरितां श्रीयुत मित्रांशीं आह्मांला वारंवार पत्रव्यवहार करावा लागे त्यामुळेंहि ते आह्मांला ज्यास्त घरोब्याचे असे वाटत. त्यांच्या पत्र लिहिण्याच्या गोड हातोटीनें तर आमच्या घरच्या लहानथोर सर्व माणसांनां ते पूर्ण परिचयाचे झाले होते. कालच्याच मेमधली गोष्ट. काशीनाथपंत हवा बदलण्यासाठीं ह्मणून लोणावळयास राहात होते तेव्हां त्यांचें एक पत्र कितीतरी गौरवून, व आर्जवानें लिहिलेलें आलें होतें, कीं, " तुह्मी जर मेच्या सुटींत पुण्याला आलांत तर एक दिवस आपल्या समागमाचा लाभ मला याल का ? माझी आपल्याला एकदां भेटण्याची फार इच्छा आहे." वगैरे. पण अरेरे, त्या पत्राचें त्या वेळीं येवढें कांहीं वाटलें नाहीं. यंदा मेच्या सुटींत आम्हीं पुण्याला गेलोंच नाहीं, व श्रीयुत मित्रांची भेटहि कांहीं महिन्यांपूर्वींच झालेली होती, ह्मणून, यंदां सुटींत पुण्याला जात नाहीं वगैरे उत्तर लिहून टाकलें; पण आज त्याबद्दल आह्मांला कितीतरी खेद वाटतो.

आज पावशतक बहुतेक सर्व मराठी जगाला, अगदीं इंग्लंड, अमेरिकेपासून सर्व हिंदुस्तानभर असलेल्या महाराष्ट्रीयांनां 'मनोरंज'नामुळें मित्र ह्मणा अथवा मित्रांमुळें मनोरंजन ह्मणा, जें एवढें अत्यंत प्रिय होऊन गेलें आहे त्यांचा विरह ह्या सर्व जगानें सोसणें ह्मणजे आतां केवढें अवघड काम होऊन बसलें आहे ! श्रीयुत मित्र यांचें अपत्य जें ' मासिक मनोरंजन ' त्याला आतां हातीं धरून त्याची जोपासना करणारे श्रीयुत मित्रांचें मित्र व बंधू कोण पुढें येतात तें पाहाण्याकडे आतां सर्वांचे डोळे लागणें साहजिकच आहे. पण, आह्मां सर्व स्त्रीवर्गाचे डोळे जितके ह्या गोष्टीकडे जास्त आतुरतेनें वेधलेले असणें स्वाभाविक आहे तितके इतरांचे क्वचितच. कारण श्रीयुत मित्रांनीं आजपर्यंत आपल्या मनोरंजनावरचें जें ब्रीदवाक्य " यत्र नार्यस्तु पूज्यंते रमन्ते तत्र देवताः " तें किती यथार्थ पाळलें आहे त्याची साक्ष त्यांच्या मनोरंजनाचा प्रत्येक वाचक सहज देऊं शकेल. कोणचाहि मनोरंजनाचा अंक पाहा, श्रीयुत मित्रांनीं त्यांतलीं थोडींतरी पानें फक्त आम्हां स्त्रियांच्याच केवळ उपयोगीं पडतील अशा लेखांनीं भरून काढलीं नाहींत असें नाहीं. त्यामुळें प्रत्येक महिन्याला नवा मनोरंजनाचा अंक कधीं येईल व आपल्या उपयोगीं असा एखादा तरी लेख आपण त्यांत केव्हां वाचूं असें आम्हांला होऊन जाणें किती रास्त होतें !

नुकतेंच एक वर्ष झालें—आपल्या कसलेल्या लेखनद्वारा स्त्रियांच्या उन्नतीप्रीत्यर्थ अहोरात्र झटणारे आमचे प्रिय बंधु श्रीयुत हरि नारायण आपटे यांनां स्वर्गवासी होऊन एकच वर्ष झालें. त्यांची विस्मृति पडावी ह्मणून आह्मी रोज खटपट करीत आहों; पण तें अजून साध्य होत नाहीं. उघडच आहे; हरिभाऊंच्या उत्तमोत्तम कादंबऱ्यांच्या रूपानें त्यांचें जागतें स्मारक प्रत्येकाच्या घरांत रात्रंदिवस जर डोळ्यांपुढें आहे तर हरिभाऊंची विस्मृति पाडण्याची आमची खटपट कशी साध्य होणार ? पण झाल्या गोष्टीस इलाज नाहीं वगैरे कसें तरी ह्मणून आह्मी हा बंधुवियोग सोसण्याची खटपट करीत होतों तोंच आमचे दुसरे प्रिय बंधु श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र यांच्यावर काळाची झडप घालून परमेश्वरा, तूं आह्मांला पुनः या बंधु—वियोगाच्या दुःखानें होरपळून टाकीत आहेस ! हाच का ईश्वरा तुझा न्यायीपणा तो ? मला वाटतें, कीं, परमेश्वरा, तुझ्यापाशींसुद्धां हा नेहमींचा विपरीत न्याय आहे, कीं, आपल्या सर्व लेंकरांत मुलींच्यापेक्षां मुलगे





अनुक्रमणिका

तेवढे जास्त तुझे आवडते ! कारण, असा जर भेदभाव तुजपाशीं नसता, तर तूं आपल्या अशक्त व अज्ञान मुलींच्याकरितां खटपट करणारे आमचे बंधु जरा कोठें वर डोकें काढतात न काढतात तोंच त्यांनां झट्कन् आपल्याजवळ ओढून खास नेतास ना! इतकेंहि करून पुनः तूं दयाळु व न्यायी आहेस तो आहेसच ! !

पण जाऊं द्या, बोलून चालून आह्मीं अज्ञानी! तेव्हां तुला दोष देत बसण्यापेक्षां, तूं काय करशील तें मुकाट्यानें सोसणें, व तूं घेऊन गेलेल्या आमच्या आवडत्या बंधूंचे गुण गात बसणेंच आह्मांला योग्य ! त्यामुळें त्यांच्या आत्म्याला व आमच्या मनाला थोडें तरी समाधान वाटेल ! आणि याप्रमाणें श्रीयुत मित्रांच्या सर्व बंधुभगिनींनीं व त्यांच्या सर्व व्यवसायबंधूंनींहि आपआपली ही कामगिरी बजावून टाकली आहे, तें योग्यच आहे.

ह्या अल्प लेख संपविण्यापूर्वी श्रीयुत काशीनाथपंत मित्र यांच्या एका थोर व्यवसायबंधूंनीं त्यांच्याबद्दल मृत्युलेख लिहितांना जो अनुचित खोडसाळपणा केला आहे त्याबद्दल चार शब्द लिहिल्यावांचून राहावत नाहीं. हे बंधु श्रीयुत मित्रांच्याबद्दल प्रथम चार शब्द औपचारिक लिहून पुढें ह्मणतात, कीं, मित्रांच्या मनोरंजनांतल्या "कित्येक लेखांमुळें विशेषतः स्त्रिया व तरुण विद्यार्थी यांच्या विचाराला अनिष्ट वळण लागण्याचा संभव होता." स्त्रियांच्याकरितां पंचवीस वर्षें एकसारखें झटणाऱ्या मित्रांबद्दल महाराष्ट्रांतल्या प्रमुख वृत्तपत्रकारानें काढलेले हे उद्गार वाचून मनाला काय वाटलें तें मुळीं सांगतांच येत नाहीं. या पत्रकाराचें हें ह्मणणें कितपत खरें आहे तें ठरविण्याचा माझा अधिकार नाहीं व हें स्थळहि त्याला योग्य नाहीं; परंतु माझ्या अल्प मतीला एवढें खास वाटतें, कीं, या विद्वान् पत्रकारांनां श्रीयुत मित्रांनीं मनोरंजनद्वारा केलेल्या कामगिरींतले दोष दाखविण्याला त्यांच्याबद्दल लिहिलेल्या मृत्युलेखाशिवाय अन्य स्थळें व वेळा दुसऱ्या पुष्कळ होत्या, त्याचा त्यांनीं उपयोग केला असता तर जास्त बरें झालें असतें !

---

५

लेखक—श्रीयुत 'शारदाश्रमवासी.'

मराठी भाषेंतील नियतकालिकांचा इतिहास लिहिणाराला, 'मनोरंजना' च्या आरंभानें मासिक पुस्तकांत एका नवीन कालास सुरवात झाली, असेंच ह्मणावें लागेल. अर्थातच या नवीन कालाचा आरंभ करण्याचें श्रेय परलोकवासी काशीनाथपंत मित्र यांनांच दिलें पाहिजे. नवीन पद्धतीच्या गोष्टी, नवीन धर्तीवरील कविता, नवीन प्रकारचा विनोद, इतकेंच नव्हे तर विषयांची नवीन प्रकारची निवड व मांडणी आणि नवीन प्रकारचें मुद्रित स्वरूप याचा एकत्र उपक्रम मासिकांच्या बाबतींत पहिल्यानें काशीनाथपंतांनींच केला, यांत संशय नाहीं. मनोरंजक वाङ्मयाचा तिरस्कार करणारे शिष्ट कांहींहि ह्मणाले, तरी तें एकंदर सारस्वताचें एक महत्त्वाचें अंग आहे, ती भाषा बोलणाऱ्या लोकांच्या अभिरुचीचें व संस्कृतीचें माप घेण्याचें एक साधन आहे, बहुजनसमाजाला नकळत शिक्षण देणारी एक फिरती शाळा आहे, ही गोष्ट नाकबूल करतां येणें शक्य नाहीं. लोकशिक्षणाचें हें उत्कृष्ट साधन काशीनाथपंतांच्या लक्ष्यांत येऊन




अनुक्रमणिका

त्यांनीं तें हातीं घेतलें. त्यांनीं तें हातीं घेतलें नसतें तर मनोरंजक वाङ्मय गेल्या पंचवीस वर्षांमध्यें अस्तित्वांत आलें नसतें असें नाहीं; मासिक पुस्तकेंहि अवतीर्ण झाल्याखेरीज राहिलीं नसतीं; परंतु काशीनाथपंतांसारख्या कल्पक, साहसी आणि उच्च ध्येय दृष्टीसमोर ठेवून वागणाऱ्या योजकाच्या अभावीं मनोरंजक वाङ्मयाचा सध्यां इतकाहि उच्च प्रतीचा आदर्श मराठी वाचकांच्या दृष्टीपुढें राहिला नसता, आणि मासिक पुस्तकांच्या अंतर्बाह्यांगांमध्यें इतकें स्थित्यंतर घडून आलें नसतें.

केशवसुत, टिळक, गोविंदाग्रज, विनायक, घाटे, Bee आदिकरून आधुनिक कविश्रेष्ठांच्या कृति, काशीनाथपंत मित्रांसारखा मित्र त्यांनां मिळाला नसता तर, इतक्या लोकप्रिय झाल्या असत्या किंवा काय याची शंकाच आहे. कोणी कवि निर्माण करूं शकत नाहीं हें खरें; तथापि नवसंप्रदायी कवींच्या कृति लोकप्रिय होण्याला व त्यांच्या त्या नवीन संप्रदायाचा प्रसार करावयाला असे मित्र मिळतील तितके हवेच असतात.

कोणतेंहि मोठें काम हातीं घेणाऱ्या मनुष्याला सिद्धि प्राप्त करून घेण्यास जे अनेक गुण लागतात ते बहुतेक सर्व गुण काशीनाथपंतांच्या अंगीं होते. त्यांच्या साहसाला चिकाटीची जोड होती, कल्पकतेला व्यवहारज्ञानाचें पाठबळ होतें, योजकतेशीं उद्यमशीलता संलग्न झालेली होती. त्यांचें ध्येय सात्त्विक होतें आणि त्या ध्येयाची प्राप्ति करून घेण्याचे त्यांचे मार्गहि सात्त्विक होते. जनतेला कसें प्रिय व्हावें हें ते जाणत होते, त्याचप्रमाणें तत्त्वांचा प्रश्न असला ह्मणजे अप्रियत्व स्वीकारण्याचें धैर्यहि त्यांच्या अंगीं होतें. लेखकांची, कवींची व इतर साहाय्य-कर्त्या मनुष्यांची निवड कशी करावी हें काशीनाथपंतांनां उत्कृष्ट कळत असे. त्यांचें साहाय्य ते मोठ्या कुशलतेनें मिळवीत असत, आणि त्यांच्या नैसर्गिक प्रेमळ स्वभावामुळें तें साहाय्य मिळण्यास त्यांनां केव्हांहि अडचण पडली नाहीं. कोणाला काय लिहावयाला सांगावें, कोणाचें कोणत्या कामीं साहाय्य घ्यावें, हें त्यांनां चांगल्या रीतीनें कळत होतें, व त्यामुळेंच त्यांचें कार्य इतकें यशस्वी झालें.

स्त्रीशिक्षण व स्त्रीस्वातंत्र्य यांच्यासाठीं प्रयत्न करणें हें आपलें पहिलें कर्तव्य आहे, असें काशीनाथपंतांनां वाटत असे. "यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः" हें 'मनोरंजना'च्या ब्रीदवाक्याच्या ठिकाणीं असलेलें वचन काशीनाथपंतांच्या दृष्टीपुढून कधींहि ढळलें नाहीं. 'मनोरंजन' आणि मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळीच्या द्वारें प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें यांचें मुख्य धोरण स्त्रियांची उन्नति हेंच होतें. आपलें मासिक पुस्तक मुख्यतः स्त्रियांसाठीं आहे, जोंपर्यंत स्त्रियांचें उच्च दर्जाचें स्वतंत्र मासिक पुस्तक अस्तित्वांत आलेलें नाहीं तोंपर्यंत तरी 'मनोरंजना'नें स्त्रियांनां उपयुक्त असणाऱ्या विषयांची हेळसांड करितां कामा नये, अशी काशीनाथपंतांची अंतःकरणपूर्वक समजूत होती, आणि त्यामुळेंच 'स्वयंपाक घरांतल्या गोष्टीं' सारखे विषय कित्येक आकुंचित समजुतीचे लोक नाकें मुरडीत असतां व तेवढ्यावरूनच आपला भारदस्तपणा भासवीत असतां, काशीनाथपंतांनीं आपल्या मासिकांत समाविष्ट केले होते.

काशीनाथपंतांची न्यायप्रियता फार तीव्र होती. सामाजिक अन्यायाचा मग तो कोणत्याहि प्रकारचा असो, त्यांनां मोठी चीड असे. त्यांची न्यायप्रियता व मतौदार्य हीं स्त्रियांपुरतींच मर्यादित




अनुक्रमणिका



प. वा. का. र. मित्र. श्रीयुत गो. म. ठेंगे.

Manoranjan, July 1920.



**मनोरंजनाचे कांहीं लेखक व कवि.**

मागें उभे—प. वा. त्र्यं. बा. ठोमरे; श्रीयुत पु. गो. काणेकर (शारदाश्रमवासी); श्रीयुत ए. पां. रेंदाळकर; प. वा. का. र. मित्र; प. वा. रा. ग. गडकरी (गोविंदाग्रज).

बसलेले—श्रीयुत वि. सी. गुर्जर; ना. ग. नवरे (नागेश); गो. म. ठेंगे, बी. ए.; श्री. कृ. कोल्हटकर, बी. ए., एलएल्. बी.; ल. वि. परळकर, बी. ए., एल्एल्. बी.



अनुक्रमणिका

झालेली नव्हती. अस्पृश्य वर्ग आणि शिक्षणांत मागसलेल्या स्पृश्य जाति यांचे ते खरे मित्र होते. जातिभेदाचे ते कट्टे शत्रु होते, आणि त्यांचें खाजगी वर्तनहि जातिभेदाच्या उघड विरुद्ध असे. समाजसुधारणेवरील त्यांची भक्ति दिखाऊ नव्हती, ते सामाजिक सुधारणेचे एकनिष्ठ भक्त होते. राजकीय बाबतींतहि त्यांचीं मतें प्रागतिक स्वरूपाचीं असत. राष्ट्रीय सभा व सामाजिक परिषद् यांच्या अनेक अधिवेशनांच्या वेळीं ते हजर होते. काँग्रेसयात्रा ही ते मोठ्या भक्तीनें करीत असत. केवळ बहुजनसमाजाला रंजवून आपलें मासिक पुस्तक लोकप्रिय करावें आणि पैसे मिळवावे, अशी काशीनाथपंतांची केव्हांहि समजूत नव्हती. तसें त्यांनीं मनांत आणलें असतें तर 'मनोरंजन' सध्यांपेक्षांहि पुष्कळ लोकप्रिय झालें असतें, त्यांनां द्रव्यप्राप्तिहि पुष्कळ अधिक झाली असती, आणि कदाचित्, त्यांच्या मृत्यूवरील लेखांत एका पत्रकारानें जे शिंतोडे उडविले ते उडविण्याचीहि बुद्धि त्याला झाली नसती. रंगभूमीवरून मुलांमुलींच्या कानांवर जाणारा जो अश्लील विनोद व उत्तान शृंगार कित्येक शिष्टांच्या लेखणींतून उतरला आहे तशा प्रकारच्या विनोदास किंवा उत्तान शृंगारास काशीनाथपंतांनीं आपल्या मासिक पुस्तकांत केव्हांहि स्थळ दिलें नाहीं, हें 'मनोरंजना'चे आतांपर्यंत प्रसिद्ध झालेले अंक वाचून कोणीहि निःपक्षपाती मनुष्य सांगूं शकेल.

'मनोरंजना'मध्यें ललितवाङ्मयाखेरीज गंभीर विषयांचीहि चर्चा करण्याचा जो उपक्रम काशीनाथपंतांनीं केला त्याच्या योगानें त्यांनां सांपत्तिक दृष्ट्या थोडीबहुत हानीच सोसावी लागली. 'मनोरंजना'मध्यें मनोरंजक वाङ्मयाखेरीज होतां होईल तों इतर विषयांचा समावेश करण्यांत येऊं नये, असें काशीनाथपंतांनां त्यांचे अनेक स्नेही व हितचिंतक सुचवीत असत. 'प्रासंगिक विचारां'नां फांटा देण्याबद्दल तर पुष्कळांचा आग्रह असे; परंतु काशीनाथपंतांनीं ही सूचना केव्हांच मान्य केली नाहीं. आपलीं प्रामाणिक मतें अगदीं स्पष्टपणें व्यक्त करण्याला त्यांनीं केव्हांहि माघार घेतली नाहीं, आणि तसें करितांना आपलें मासिक बहुजनसमाजाला अप्रिय होईल आणि वर्गणीदारांची संख्या वाढण्याच्या बाबतींत ती गोष्ट आड येईल या भीतीची पर्वा त्यांनीं कधींहि केली नाहीं. केवळ मनोरंजन करणें हेंच आपलें ध्येय नाहीं, तर मनोरंजनाच्या द्वारें लोकांत प्रागतिक विचारांची जागृति करणें हें आपलें पवित्र कर्त्तव्य आहे, असें त्यांची मनोदेवता त्यांनां सांगत असे. प्रस्तुत लेखकाच्या मनांत काशीनाथपंतांविषयीं जी पूज्यबुद्धि वसत आहे ती मुख्यत्वेंकरून याच त्यांच्या गुणामुळें. एखाद्या लेखकाला आपल्या स्पष्ट लिहिण्यानें 'मनोरंजना'चें नुकसान होईल अशी भीति वाटावी, परंतु खुद्द काशीनाथपंतांनीं मात्र तत्त्वाचा प्रश्न आला असतां त्या भीतीची छायाहि आपल्या मनावर पडूं देऊं नये, असे कित्येक प्रसंग प्रस्तुत लेखकाच्या प्रत्यक्ष अनुभवास आले आहेत.

'पैसे घेऊन वाटेल त्या माणसाचें चित्र आणि चरित्र प्रसिद्ध करावें, एखाद्या वर्गामध्यें आपलें मासिक लोकप्रिय करण्यासाठीं क्षुल्लक गोष्टींनांहि महत्त्व द्यावें, असें 'मनोरंजना'चें धोरण काशीनाथपंतांनीं ठेविलें असतें आणि मनोरंजक वाङ्मयापलीकडे आपली दृष्टि फेंकिली नसती तर त्यांच्या मासिकाचा सध्यापेक्षांहि अधिक प्रसार झाला असता, ते सर्व मतांच्या लोकांनां सारखेच प्रिय झाले असते, आणि त्यांनां पैसाहि अधिक मिळवितां आला असता; परन्तु त्यांनां पैशापेक्षां 'मनोरंजना'च्या दर्ज्याची विशेष पर्वा होती, लोकप्रियतेपेक्षां तत्त्वाची अधिक आवड होती, आणि लौकिक मानापेक्षां स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीची किंमत त्यांनां अधिक वाटत असे.





अनुक्रमणिका

परलोकवासी काशीनाथपंतांचा मताभिमान जसा तीव्र होता तसा त्यांचा 'मित्र' पणाहि नैसर्गिक होता. आपल्या स्नेह्यांशीं ते अकृत्रिमपणानें वागत असत, आणि आपल्याशीं अकृत्रिमपणें वागणाऱ्या स्नेह्यांनां मदत करण्याचा प्रसंग आला असतां ते आपली व्यापारी दृष्टि उपयोगांत आणीत नसत. राजकीय व सामाजिक बाबतींत त्यांच्या मतांशीं ज्यांचीं मतें जुळत नसत अशा अनेक लोकांशीं त्यांचा खाजगी संबंध प्रेमळपणाचा व परस्पर आदराचा असे. मत व माणुसकी यांच्यांतील भेद त्यांनां चांगल्या रीतीनें ठाऊक होता. त्याचप्रमाणें कोणाहि मनुष्याचा वाईटपणा शाबीत होईपर्यंत त्याच्या ठिकाणीं चांगुलपणाचीच कल्पना करण्याचें काशीनाथपंतांचें धोरण असे. मित्रांच्या मित्रपरिवारांत सर्व जातींचीं, सर्व धर्मांची व विविध मतांचीं माणसें आहेत. मराठी भाषा बोलणाऱ्या ख्रिस्ती व ज्यू लोकांमध्यें काशीनाथपंतांइतका लोकप्रिय हिंदु गृहस्थ कोणी नव्हता. भाषा हें एक पवित्र नातें आहे असें काशीनाथपंतांनां खरोखर मनापासून वाटे, त्यामुळें तें एकपरी स्वाभाविक होतें.

प. वा. काशीनाथपंतांचा शेवटचा मनोरथ 'नेशन,' 'न्यू स्टेट्स्मन ' यांच्या धर्तीवर, पण इकडील परिस्थितीला अनुसरून थोडा फरक करून प्रागतिक पक्षाचें एक साप्ताहिक मराठी पत्र सुरू करण्याचा होता. या पत्राच्या अंतर्बाह्यांगासंबंधानें त्यांनीं कित्येक योजना मनांत तयार करून ठेविलेल्या होत्या. या पत्राच्या द्वारें आगरकरांच्या सामाजिक व गोखल्यांच्या राजकीय संप्रदायांचा प्रसार करावयाचा, परंतु त्याबरोबरच तें महाराष्ट्रामध्यें खेडोखेडीं जाईल, साक्षर लोकांनां तें वाचावेंसें वाटेल असें त्याला स्वरूप द्यावयाचें, त्याच्या प्रसिद्धीसाठीं आरंभीं साहस करून बरेचसे पैसे खर्च करावयाचे, निवडक लेखक मंडळी मिळवावयाची आणि एक दोन वर्षें पैशाचें नुकसान सोसावें लागलें तरी तें सोसावयाचें—नुकसानीसाठीं कांहीं रक्कम आगाऊ काढून ठेवावयाची, असें काशीनाथपंतांनीं ठरविलेलें होतें. शेवटच्या दुखण्यांत लोणावळ्याला जाईपर्यंत हा त्यांचा बेत कायमच होता. त्यांच्या चेहऱ्यावर मृत्यूची पूर्वच्छाया दिसूं लागली होती अशा वेळींहि त्यांनीं या आपल्या नवीन योजनेसंबंधानें गोष्ट काढलेली पाहून प्रस्तुत लेखकाला तर त्यांच्या शारीरिक आपत्तींनां न जुमानणाऱ्या उत्साहाविषयीं आश्चर्यच वाटलें. काशीनाथपंत या दुखण्यांतून बचावले असते तर त्यांनीं आपला वरील बेत खात्रीनें सिद्धीस नेला असता, आणि मासिकांप्रमाणें मराठी वर्तमानपत्रांतहि आपली कल्पकता, साहस व उद्योग यांच्या जोरावर विलक्षण परिवर्तन घडवून आणलें असतें, अशी प्रस्तुत लेखकाची खात्री आहे. काशीनाथपंतांचा हा हेतु सिद्धीस नेणारा दुसरा कोणी मनुष्य आज तरी महाराष्ट्रांत नाहीं खास.

सारांश, मित्र हे मराठी भाषेचे मित्र होते, महाराष्ट्र वाङ्मयाच्या उपासकांचे मित्र होते, स्त्रीवर्गाचे मित्र होते, अस्पृश्य म्हणून गणल्या जाणाऱ्या वर्गाचे मित्र होते, विद्येंत मागसलेल्या जातींचे मित्र होते, समाजसुधारणेचे मित्र होते, राष्ट्राच्या उद्धारार्थ झटणाऱ्या लोकांचे मित्र होते, अखिल महाराष्ट्राचे मित्र होते. मासिकांचे संपादक व पुस्तकांचे प्रकाशक 'झाले बहु, होतिल बहु, असति बहु परंतु यासम हा ' असें मराठी भाषेच्या पुरतें तरी म्हणावयास प्रत्यवाय नाहीं.

---



अनुक्रमणिका

# प. वा. काशीनाथ रघुनाथ मित्र यांचें अल्प चरित्र.

"उद्यमेन हि सिद्ध्यंति कार्याणि न मनोरथैः।"

"विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमाना
प्रारब्धमुत्तमजना न परित्यजन्ति ॥"

प. वा. काशीनाथपंत मित्र यांचें समग्र चरित्र या ठिकाणीं देण्याचा आज आमचा विचार नाहीं. त्यांच्या चरित्राची सामुग्री जमविण्याचा आह्मी प्रयत्न चालविला आहे, व सर्व सामुग्रीची जुळवाजुळव होतांच त्यांचें विस्तृत चरित्र महाराष्ट्र वाचकवर्गास सादर करण्याचा आमचा मानस आहे. काशीनाथपंत आज पंचवीस वर्षें महाराष्ट्राच्या वाङ्मयक्षेत्रांत वावरत होते, व अनेक सामाजिक व शिक्षणविषयक चळवळींस त्यांचें सहाय्य होतें, अशी जरी स्थिति होती तथापि सार्वजनिक चळवळींत ते कधीं पुढें येत नसत यामुळें त्यांच्या चरित्रांतील पुष्कळ गोष्टींची माहिती लोकांस नाहीं. त्यांच्या एकंदर चरित्राचा विचार केला तर तें सर्वांगें स्फूर्तिदायक व उदाहरणीय आहे. मराठी नियतकालिकांच्या इतिहासांत त्यांच्यासारख्या अल्प सामर्थ्याच्या माणसानें चिरस्मरणीय संक्रमण घडवून आणलें ही कामगिरी लहान नाहीं. विलायतेंतील सुप्रसिद्ध लोकप्रिय स्ट्रँड मासिकाचे संस्थापक व चालक मि. न्यून्स किंवा अमेरिकेंतील नामांकित 'मॅक्लूर्स मॅगझिन'चे संस्थापक व चालक मि. मॅक्लूर यांचीं चरित्रें जितकीं हृदयंगम, उदाहरणीय, व स्फूर्तिजनक आहेत तितकेंच 'मनोरंजन' मासिकपुस्तकाचे संस्थापक, चालक व संपादक काशीनाथ रघुनाथ मित्र यांचेंहि चरित्र आमच्या देशाच्या आजच्या स्थितींत अनेक दृष्टींनीं आदर्शवत् आहे, व यासाठींच तें सविस्तरपणें महाराष्ट्रापुढें येणें अवश्य आहे. आज या ठिकाणीं फक्त त्यांच्या चरित्रांतील कांहीं ठळक गोष्टींचा निर्देश करण्याचें आम्हीं योजिलें आहे.

रत्नागिरी जिल्ह्यांतील सावंतवाडी संस्थानांत आजगांव म्हणून एक लहानसें गांव आहे; त्या ठिकाणीं १८७१ सालच्या नवंबर महिन्याच्या दुसऱ्या तारखेस काशीनाथपंतांचा जन्म झाला. त्यांची घरची स्थिति गरीबीची होती. त्यांचे वडील व्यापार करून कुटुंबाचा योगक्षेम चालवीत असत. ते मोठे भाविक व धर्मनिष्ठ होते. त्यांनां एकंदर तीन पुत्र व एक कन्या मिळून चार अपत्यें झालीं. काशीनाथपंत हे त्यांचे द्वितीय चिरंजीव. काशीनाथपंतांचे वडील बंधु मुंबईस तारऑफीस-मध्यें होते. ते मुंबईंतील प्लेगाच्या पहिल्या संहारास बळी पडले. श्रीयुत दामोदरपंत हे काशीनाथ-पंतांचे धाकटे बंधु होत. काशीनाथपंतांचे वडील काशीनाथपंत लहान असतांनाच वारले; त्यामुळें त्यांनां पितृसुख फारसें प्राप्त झालें नाहीं. तथापि त्यांच्या कोवळ्या मनावर त्यांच्या वडिलांच्या भाविक आचरणाचा व सत्त्वस्थ वृत्तीचा लहानपणींच जो थोडासा परिणाम झाला तो आमरण टिकला व काशीनाथपंतांच्या मनोभावनांचा विकास करण्यास तो पुष्कळअंशीं कारणीभूत झाला.

काशीनाथपंतांचें प्राथमिक मराठी शिक्षण आजगांवच्या मराठी शाळेंत झालें. शिक्षकाच्या कामांत प्रशंसा मिळविलेले श्रीयुत शिनारी हे त्या वेळीं या शाळेवर अध्यापक होते. त्यांच्या उत्तम शिक्षणापासून आपणास फार फायदा झाला असें काशीनाथपंत सांगत असत. मराठी सहा इयत्ता पुऱ्या झाल्यावर त्या वेळीं मराठी सहाव्या इयत्तेची 'पब्लिक सर्व्हिस' परीक्षा म्हणून होत असे ती काशीनाथपंतांनीं दिली व तींत ते यशस्वी झाले.





अनुक्रमणिका

त्यांच्या घरची स्थिति गरीबीची होती हें वर सांगितलेंच आहे. त्यामुळें त्यांनां पुढें इंग्रजी शिक्षण संपादन करण्याची तीव्र इच्छा असतांहि तें संपादन करण्यास ते समर्थ झाले नाहींत. यापूर्वी कांहीं वर्षे त्यांचे वडीलहि वारलेले, वडील बंधु विद्याभ्यासासाठीं नागपुरास जाऊन राहिलेले अशा स्थितींत कुटुंबपोषणाचा सर्व भार काशीनाथपंतांवर येऊन पडला व त्याकरितां त्यांनां उदरनिर्वाहाचा मार्ग पाहणें भाग पडलें. आपली मातुःश्रीं, धाकटे बंधु व धाकटी बहिण यांनां घेऊन ते १८८८ सालीं वेंगुर्लें येथें आले व तेथें त्यांनीं मराठी शाळेंत असिस्टंट मास्तराची नोकरी धरली. या जागेचा पगार त्या वेळीं सहा रुपये मिळत असे. तेवढ्यांत कुटुंबाचा खर्च चालत नसे ह्मणून ते कांहीं शिकवण्या करीत.

ते शाळेंत शिक्षकाचें काम करीत होते तथापि त्यांच्या मनांतील इंग्रजी शिक्षण संपादनाची तळमळ कांहीं नाहींशी झाली नव्हती. याच सुमारास उत्तम मराठी शिक्षक ह्मणून कीर्ति मिळविलेले श्रीयुत लक्ष्मण यशवंत पांवसकर हे सदरहू शाळेंत मास्तर होते. त्यांच्याहि मनांत इंग्रजी शिक्षण मिळविण्याची तीव्र इच्छा होती. काशीनाथपंतांचा व त्यांचा दृढ स्नेह जमला व दोघांनीं फुरसतीच्या वेळांत इंग्रजी शिकण्याचा निश्चय केला. इंग्रजी शिकण्यासाठीं शिक्षक ठेवावा तर तेवढें सामर्थ्य नव्हतें, शाळेंत जावें तर नोकरी सोडून तसें करणें शक्य नव्हतें, यामुळें सकाळीं दहा वाजतां शाळा सुटल्यावर ती पुनः दुपारीं दोन वाजतां भरेपर्यंत मध्यंतरीं जो वेळ मिळे तेवढ्या वेळांत इंग्रजी शाळेंत जाऊन तेथें जेवढें शिक्षण मिळेल तेवढें मिळविण्याचें उभयतांनीं ठरविलें. या दोन होतकरू तरुणांची ही शिक्षणलालसा पाहून त्या वेळचे वेंगुर्लें येथील इंग्रजी शाळेंतील मास्तर श्रीयुत रघुनाथ घनःश्याम हवालदार ऊर्फ बापू मास्तर व श्रीयुत रंगराव सांखोळकर यांनीं त्यांनां मदत करण्याचें कबूल केलें. शाळेचे हेड मास्तर श्रीयुत वर्दे यांनींहि ह्या विद्यार्थ्यांची जिज्ञासा पाहून शाळेंतील शिक्षणाचे तास ह्या विद्यार्थ्यांस सोयवार होतील अशा तऱ्हेनें बदलून दिले. काशीनाथपंत व श्रीयुत पांवसकर यांनीं रात्रौ बाराबारा वाजेपर्यंत जागून व पुनः चार वाजतां पहांटेस उठून इंग्रजी धडे करावे व बाकी वेळांत उदरनिर्वाहाचा व्यवसाय करावा, असा क्रम चालविला होता; परंतु या अतिश्रमाचा प्रकृतीवर परिणाम होऊं लागल्यामुळें व कुटुंबाच्या खर्चासाठीं आणखी काम करणें भाग पडल्यामुळें वरील क्रम त्यांनां सोडून देणें भाग पडलें. पुढें मुंबईंत आल्यावर त्यांनीं इंग्रजीचा खासगी रीतीनें अभ्यास करून ती भाषा अवगत करून घेण्याची आपली इच्छा तृप्त केली. असो.

मराठी शाळेंत शिकत असल्या वेळेपासूनच काशीनाथपंतांनां वाचनाचा नाद लागला होता. जें जें पुस्तक हातीं येई तें तें ते आस्थेनें व लक्ष्यपूर्वक वाचीत व निबंधांचीं व ज्यांत देशस्थितीसंबंधाचे विचार प्रगट केलेले असतील अशा पुस्तकांचीं तर ते पारायणें करीत. मराठी कविता वाचण्याची गोडीहि त्यांनां लहानपणापासूनच लागली होती. ह्या एकंदर वाचनाचा परिणाम त्यांच्या मनावर बराच झाला. पुढें वेंगुर्ल्यास आल्यावर तेथील नेटिव्ह जनरल लायब्ररींत ते नित्य नियमानें एकदोन तास घालवूं लागले. तेथें सायंकाळीं शाळा सुटल्यावर त्यांनीं जाऊन बसावें व वर्तमानपत्रांचे व मासिकपुस्तकांचे ताजे अंक त्यांनीं काळजीपूर्वक वाचावे. त्यांच्या रोजच्या कार्यक्रमांतील हें एक अंगच होऊन बसलें. केसरी व सुधारक यांचें तर त्यांनीं जणूं



काय अध्ययनच करावें. त्या वेळीं केसरी व सुधारक यांच्यामध्यें अनेक विषयांवर वादविवादाचीं रणें माजत असत, व टिळक आणि आगरकर यांच्या तेजस्वी लेखण्यांचे ते सामने असल्यामुळें ते तरुणांच्या मनांत विलक्षण खळबळ उडवीत. काशीनाथपंतांच्या मनावरहि या वादविवादाचा परिणाम झाला. आपल्या सामाजिक दुःखांची त्यांनां स्पष्टपणें ओळख पटली व आपल्या देशबंधुभगिनींच्या दुःखांचा परिहार करण्यासाठीं आपल्या हातून होईल तितका प्रयत्न करणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे अशी तीव्र तळमळ त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. अशा रीतीनें देशाच्या दुःखांची जाणीव मनांत उत्पन्न झाल्यावर आणि त्यांचें चित्त देशमय बनूं लागल्यावर आपला मनोरथ सिद्धीस नेण्यासाठीं मुंबईस जावें अशी त्यांनां साहजिकच इच्छा झाली आणि त्याप्रमाणें वेंगुर्लें सोडून १८९३ सालच्या सुमारास ते मुंबईस आले.

मुंबईस आल्यावर त्यांनां कोणाचा आधार नव्हता ह्मणून चरितार्थासाठीं त्यांनां उद्योग पहावा लागला. मुंबईंतील म्युनिसिपल मराठी शाळेंत शिक्षकाचें, सावकारी पेढीवर व गोदींत कारकुनीचें, वगैरे कामें त्यांनीं कांहीं दिवस केलीं. त्या वेळीं 'प्रभाकर' ह्मणून एक मराठी दैनिकपत्र निघत असे. त्यांत रिपोर्टराचेंहि काम कांहीं दिवस त्यांनीं केलें, व त्यांत त्यांच्या अंगची हुषारी दिसून आली. यांच्या आधींपासूनच बहुजनसमाजांत लोकप्रिय होईल असें एक सचित्र मासिक पुस्तक काढावें असा विचार त्यांच्या मनांत घोळूं लागला होता, व त्याची योजनाहि त्यांच्या मनांत चालली होती. मध्यंतरीं त्यांचे परम मित्र प. वा. ज. धों. भांगले व श्रीयुत गोविंद बाळकृष्ण कालेलकर यांनीं 'विद्यार्थी मित्र' या नांवाचें एक सुंदर मासिक पुस्तक लहान मुलांसाठीं काढलें होतें. या मासिकाला वर्गणीदार मिळवून देऊन त्याचा प्रसार करण्यासाठीं काशीनाथपंतांनीं बरेच श्रम केले. आधुनिक कविश्रेष्ठ प. वा. केशवसुत हे त्या वेळीं 'विद्यार्थीमित्रा'-साठीं कविता लिहीत असत. त्यांचा व काशीनाथपंतांचा याच वेळेपासून स्नेह जमला असावा.

पुढें आपल्या मराठींतील पहिलें सचित्र मासिक पुस्तक काढण्याच्या कल्पनेस मूर्त स्वरूप देण्याची तयारी करून १८९५ सालच्या जानेवारी महिन्यांत मनोरंजनाचा पहिला अंक त्यांनीं प्रसिद्ध केला. या मासिक पुस्तकाचें नांव 'मासिक मौज' असें ठेवावयाचें असें त्यांनीं प्रथम ठरविलें होतें व त्याप्रमाणें जाहीर केलें होतें; परंतु त्या वेळीं 'मासिक मजाह' नांवाचें एक गुजराती मासिक पुस्तक निघत असे. त्याच्या कर्त्यांनें दोन्ही नांवें जवळजवळ सारखींच वाटतात यासाठीं तुह्मीं आपल्या मासिकाचें नांव बदला असा काशीनाथपंतांस आग्रह केल्यामुळें, त्यांनीं आपल्या मासिकाचें 'मासिक मनोरंजन' असें नामकरण करून पहिला अंक प्रसिद्ध केला. या पहिल्याच अंकांत आरंभीं लिहिलेल्या 'स्वतःविषयींच्या दोन शब्दां'त काशीनाथपंत ह्मणतातः—

"आम्ही कशाकरितां अवतार धारण केला आहे व पुढें काय करणार हें खमुखानें बरळण्यापेक्षां आमच्या सर्वांगाचें परिशीलन केल्यानें हळुहळू आमचे उद्देश आमच्या प्रेमळ आश्रयदात्यांच्या लक्ष्यांत येतील, असें आम्हांस वाटतें. आम्हांस जें काय करावयाचें आहे तें सवडीसवडीनें आम्ही करून दाखवूं, येवढेंच या ठिकाणीं सांगण्याची परवानगी घेतों. पुस्तक लोकांस आवडेलसें करण्याचे कामीं आमच्याकडून बिलकुल कसूर होणार नाहीं, हें खचित."

व त्याप्रमाणेंच काशीनाथपंतांनीं करून दाखविलें.




अनुक्रमणिका

'मनोरंजन' पहिल्यानें निघालें त्या वेळीं त्याची वार्षिक वर्गणी फक्त आठ आणे ठेविली होती, व तीहि प्रत्येक तिमाहीस दोन आण्यांप्रमाणें चार हप्त्यांनीं घेण्याची योजना त्यांनीं केली होती. याचें कारण लोकांस वर्गणीचा भार वाटूं नये, व आपल्या मासिकाचा लोकांत सहजासहजीं पुष्कळ प्रसार व्हावा. त्यांची ही योजना थोड्याच अवधींत सफळ झाली, व अवघ्या एका वर्षाच्या अवधींतच त्यांनां दोन हजारांवर वर्गणीदार मिळाले. पहिला अंक रॉयल १२ पृष्ठांचा असून त्यांत दोन पानें लिथोवरचीं चित्रें दिलीं होतीं. या चित्रांत बालावृद्धविवाहाचा दुष्परिणाम दाखविला आहे. मराठींत अशा तऱ्हेचें सचित्र मासिक काढण्याचा हा पहिलाच प्रयत्न होता, व त्याप्रमाणें पहिल्या अंकाच्या मलपृष्ठावर " मराठींत पहिल्याप्रथमचें सचित्र, मनोरंजक, आणि अति स्वस्त मासिक पुस्तक " असें लिहिलें आहे. यावेळीं ठाण्यास 'हिंदुपंच,' मुंबईस 'मुंबईपंच,' 'भूत' वगैरे कांहीं सचित्र विनोदी वर्तमानपत्रें मात्र निघत असत. हा पहिला अंक 'सुबोधप्रकाश' छापखान्यांत छापला आहे.

प्रथम कांहीं कालपर्यंत 'मनोरंजना'च्या अंकांतील बहुतेक सर्व मजकूर काशीनाथपंतच लिहीत असत. मुंबईस आल्यावर ते गुजराती शिकले. गुजराती मासिकांत चांगले लेख येत त्यांचीं भाषांतरें करून ते 'मनोरंजनां'त देत असत. बंगाली वाङ्मयाची मराठी वाचकांस त्या वेळीं विशेष ओळख झाली नव्हती. त्या भाषेंत बऱ्याचशा उत्कृष्ट कादंबऱ्या असून कांहीं उत्तम मासिकेंहि प्रसिद्ध होत असतात असें काशीनाथपंतांस समजलें म्हणून त्या भाषेचा त्यांनीं अभ्यास केला व त्या भाषेंत अल्पावधींत चांगली गति करून घेऊन बंगाली गोष्टींचीं वगैरे भाषांतरें करून ते 'मनोरंजनां'त देऊं लागले. लोकांनांहि या नवीन वाङ्मयाचा परिचय आवडूं लागला व 'मनोरंजन' लोकप्रिय होत चाललें. जसजशी आपल्या मासिकपुस्तकाची लोकांवर छाप बसत चालली तसतसा त्याच्या विषयांत उपयुक्त फेरफार करण्यास सुरवात करून बहुजनसमाजाच्या विचारास सामाजिक बाबतींत एका विशिष्ट प्रकारचें वळण लावण्यास त्यांनीं प्रारंभ केला. अगदीं आरंभीं या मासिक पुस्तकाला जें केवळ घटकाभर मौजेचें स्वरूप होतें तें त्यांनीं लवकरच बदललें, व मनोरंजनांत निबंधात्मक व मनोरंजनात्मक असे दोन्ही तऱ्हेचे विषय देण्यास आरंभ केला. मात्र एक धोरण त्यांनीं ठेवलें होतें व तें हें, कीं, फार भारदस्त, ज्यांनां थोडेच विद्वान् वाचक भेटावयाचे असे विषय 'मनोरंजनां'त समाविष्ट करावयाचे नाहींत. जे विषय 'मनोरंजनां'त द्यावयाचे ते पुष्कळांनां कळतील व पुष्कळजण वाचतील असेच द्यावयाचे. तसेंच जो मजकूर मनोरंजनांत येईल, मग तो मनोरंजनपर असो अथवा निबंधाच्या स्वरूपाचा असो, त्यांत कांहींतरी उपदेश, विचारांनां वळण लावणारा कांहीं तरी भाग असावयाचा. आपल्या देशांतील महिलावर्गाची उन्नति झाल्याशिवाय देशाची सर्वांगीण सुधारणा होणार नाहीं अशी त्यांची दृढ समजूत होती. ह्या विचारांच्या तळमळीमुळेंच आपल्या पत्नीच्या--प. वा. सौ. मनोरमाबाई मित्र यांच्या संपादकत्वाखालीं त्यांनीं 'महाराष्ट्र महिला' हें केवळ स्त्रियांकरितां म्हणून मासिक पुस्तक काढलें. मनोरंजनांत विषयाचीं योजना करतांनाहि महिलावर्गाच्या उन्नतीचाच प्रश्न त्यांच्या दृष्टीपुढें नेहमीं घोळत असे व पुढें ' यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः ' हें त्यांनीं मनोरंजनाचें ब्रीदवाक्य ठरवून तें प्रत्येक अंकाच्या मलपृष्ठावर शिरोभागीं छापण्यास सुरवात केली. 'मनोरंजनां'त त्यांनीं




अनुक्रमणिका

उत्तरोत्तर जी सुधारणा केली ती वरील धोरणानें केली, व यामुळेंच बाष्कळ विनोदाला किंवा फाजील-पणाला 'मनोरंजनांत' कधीं वाव मिळाला नाहीं. 'मनोरंजना'च्या आरंभींचे अंक व त्याचे अलीकडील अंक हे ताडून पाहिले असतां त्यांत फारच फरक झालेला दिसून येईल; परंतु हा फरक लोकांच्या विचारांनां उदात्तपणाचें वळण लावण्याची जी तळमळ काशीनाथपंतांच्या चित्ताला रात्रंदिवस लागून राहिलेली होती त्याचें फल होय.

'मनोरंजन' काढते वेळीं काशीनाथपंतांजवळ पैशाचें पाठबळ कांहींच नव्हतें; परंतु त्यांचा संकल्प सत्य असल्यामुळें छापखानेवाले त्यांनां, छपाईचे पैसे सवडीनें घेण्याचें कबूल करून, मासिक पुस्तक छापून देण्यास तयार झाले. त्या वेळीं काशीनाथपंत ठाकुरद्वारवरील कामत कंपनीच्या एका खोलींत राहत असत. त्याच खोलींत 'मनोरंजना'चें ऑफिसहि होतें. त्यांच्याच शेजारीं प. वा. बाळकृष्ण रामचंद्र कुलकर्णी या नांवाचे दुसरे एक वाङ्मयभक्त राहत असत. काशीनाथपंतांची व त्यांची मैत्री जमली, व बाळकृष्णपंत 'मनोरंजना'च्या संपादकीय कामांत मदत करूं लागले. ते पोष्टांत कारकून होते. काशीनाथपंतांबरोबर तेहि बंगाली शिकले. 'मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी'च्या पुस्तकमालेंतील 'सरस्वती' व 'परिणामीं हेंच' या कादंबऱ्या प. वा. कुळकर्णी यांनींच लिहिल्या आहेत.

'मनोरंजना'चा जसजसा प्रसार होत चालला व त्याची लोकप्रियता वाढूं लागली तसतशी विद्वान् लेखक मंडळीहि वाढून त्यांनां आपले लेख त्यांतून लोकांपुढें यावे असें वाटूं लागलें. काशीनाथपंतांनींहि अनेक जुन्या लेखकांस व कवींस 'मनोरंजना'साठीं लिहिण्यास प्रवृत्त केलें, व होतकरू नवीन लेखकांस उत्तेजन दिलें. यामुळें 'मनोरंजना'चा लेखकवर्ग वाढत चालला व त्याचें अंतरंग अधिकाधिक हृदयंगम व चित्ताकर्षक होऊं लागलें.

बाह्यांगाकडेहि काशीनाथपंतांचें अगदीं आरंभापासून लक्ष होतें. या बाबतींत पाश्चात्य देशांतील उत्कृष्ट सचित्र मासिक पुस्तकांचा आदर्श त्यांनीं आपल्या पुढें ठेवला होता, व त्यांच्या-सारखें हें मासिक करून दाखविण्याची धमक त्यांनीं आरंभापासून बाळगली होती, व त्याप्रमाणें चिकाटी धरून त्यांनीं 'मनोरंजनां'त सुधारणा केली. 'मनोरंजना'च्या दुसऱ्या वर्षाच्या पहिल्या अंकांत काशीनाथपंत ह्मणतातः—

" आपल्या महाराष्ट्र भाषेमध्यें इंग्लिश अमेरिकन पद्धतीवर, अतिशय अल्प किंमतीचें एक सचित्र मासिक पुस्तक असावें, असा विचार आमचे मनांत बऱ्याच वर्षांपासून एकसारखा घोळत असल्यामुळें, गेल्या सालापासून तो अमलांत आणण्याच्या प्रयत्नांस आम्हीं सुरवात केली आहे. कोणाचेंहि साहाय्य नसतां, मोठें धाडस करून आम्हीं या मोठ्या खर्चाच्या व जबाबदारीच्या कामास हात घातला व कळविण्यास आनंद वाटतो, कीं, परम न्यायी व परम दयाळू परमेश्वर या कामीं आम्हांस साहाय्य झाला! गुदस्त सालच्या आमच्या अनुभवावरून आमची खात्री होऊन चुकली आहे, कीं, शुद्ध भावानें सतत उद्योग चालविला असतां तो सच्चिदानंद परमात्मा मनोरथ पूर्ण केल्यावांचून कधींहि राहणार नाहीं."

मराठी मासिकपुस्तकांच्या बाह्यांगाच्या बाबतींत 'मनोरंजना'च्या द्वारें काशीनाथपंतांनीं कशी सुधारणा घडवून आणली आहे हें वाचकांच्या दृष्टीपुढें आहेच. आपल्या मासिकांतील मजकुराची ठाकठीक मांडणी, निरनिराळ्या टाइपांची मोहक योजना, व यांनां मनोहर चित्रांची




अनुक्रमणिका

जोड या गोष्टींकडे काशीनाथपंतांचें अगदीं पहिल्यापासून कसें लक्ष्य होतें हें 'मनोरंजना'चे जुने अंक चाळून पाहिले असतां दिसून येईल. या बाह्यांगाच्या सुधारणेसाठीं खर्चाकडे न पाहतां त्यांनीं अनेक छापखाने बदलले. कांहीं दिवस ते 'टाइम्स ऑफ इंडिया' मधून आपले अंक छापून घेत असत. शेवटीं सुप्रसिद्ध 'निर्णयसागर' छापखान्याचा व त्यांचा ऋणानुबंध जडला, व 'मनोरंजना'चा स्वतःचा छापखाना निघेपर्यंत निर्णयसागरांतूनच ते आपले अंक छापून घेत असत.

'मनोरंजना'ची वाढ करीत असतां काशीनाथपंतांनां अनेक संकटाशीं झगडावें लागलें. मुंबईंतील पहिल्या प्लेगच्या दिवसांत तर त्यांची फारच त्रेधा उडाली. सांपत्तिक अडचणीहि 'आ' पसरून अनेक वेळां त्यांच्यापुढें उभ्या राहिल्या; परंतु त्यांचा निश्चय अढळ होता; त्यांचा आत्मविश्वास दांडगा होता; त्यांचा संकल्प सत्य होता. यामुळें परमेश्वरानें त्यांचीं संकटें निवारण करून उत्तरोत्तर मार्ग आक्रमण करण्यास त्यांनां धैर्य दिलें, व 'मनोरंजना'चें योग्य प्रकारें संवर्धन करण्याचें सामर्थ्य त्यांच्या मनांत उत्पन्न केलें. त्यांची वाङ्मयसेवा पाहून विद्याभिलाषी श्रीमन्महाराज सयाजीराव गायकवाड यांनीं त्यांनां मदत केली, व ती मदत योग्य प्रसंगीं मिळाल्यामुळें तिचा फार उपयोग झाला. इतर राजे महाराजे हेहिं 'मनोरंजना'वर कृपादृष्टि ठेवूं लागले. एकंदर महाराष्ट्राला 'मनोरंजन' आपलें वाटूं लागलें इतकी त्याच्याविषयीं लोकप्रियता महाराष्ट्रांत काशीनाथपंतांनीं उत्पन्न केली.

पहिला दिवाळीचा अंक हा तर त्यांच्या धाडसाचें एक उत्तम उदाहरण आहे. या अंकाची कल्पना त्यांच्या मनांत ठसविण्यास महाराष्ट्रांतील दुसरे एक धाडसी पुस्तकप्रकाशक व काशीनाथपंतांचे परम मित्र प. वा. रावसाहेब गोविंद माधवराव डुकले हे कारणीभूत झाले, व त्यांनीं या कामीं त्यांनां उत्तेजन देऊन मराठी नियतकालिकांत हें नवीन साहस करून दाखविण्यास प्रवृत्त केलें. यानंतर काशीनाथपंतांनीं 'मनोरंजना'चे दिवाळी व वसंत, दरबार, आगरकर वगैरे अंक प्रसिद्ध केले; त्यांतहि त्यांनीं धाडसच दाखविलें. त्यांनीं स्वतंत्र छापखान्याची उभारणी केली तीहि केवळ धाडसाच्याच जोरावर. त्यांनीं आपलें 'मनोरंजन' आपल्या छापखान्यांत छापण्यासाठीं ह्मणून स्वतंत्र छापखाना काढण्याचा खटाटोप केला; व यांत त्यांचा संकल्प सत्य असल्यामुळें महाराष्ट्रानें त्यांनां प्रेमानें मदत केली. निर्णयसागर छापखान्याचे मालक प. वा. शेट तुकाराम जावजी व श्रीयुत शेट पांडुरंग जावजी यांनीं, काशीनापंतांनीं स्वतंत्र छापखाना काढला हें मनांतहि न आणतां मनोरंजन छापखान्याच्या उभारणीस अनेक तऱ्हेनें मोठ्या कळकळीनें मदत केली. कर्नाटक छापखान्याचे मालक प. वा. गणपतराव कुळकर्णी यांचीहि त्यांनां या कामीं पुष्कळ मदत झाली. निर्णयसागराच्या मालकांचें व त्या छापखान्यांतील मंडळीचें काशीनाथपंतांवर इतकें प्रेम असे, कीं, काशीनाथपंत हे एका स्वतंत्र छापखान्याचे मालक झाले असूनहि व त्यांचा छापखाना महाराष्ट्रांत नमुनेदार होऊं पहात असूनहि ते त्यांनां आपले वाटत.

काशीनाथपंतांच्या अंगच्या अनेकविध गुणांचें वर्णन या अंकांत त्यांच्या परम स्नेह्यांनीं लिहिलेल्या लेखांत आलेलेंच आहे. त्यांचीं मतें, संपादक या नात्यानें त्यांची योग्यता, त्यांचें ध्येय व धोरण, आपल्या भोंवतीं लेखकमंडळ गोळा करण्याची त्यांची हातोटी यांचेंहि वर्णन त्या लेखांत झालें आहे. त्यांनीं जी कामगिरी केली तिचा गौरवयुक्त उल्लेख सदरहू लेखांशिवाय





अनुक्रमणिका

'नवयुगां'त प्रसिद्ध झालेल्या त्यांच्यासंबंधींच्या लेखांत व आमच्या सर्व व्यवसायबंधूंनीं त्यांच्याविषयीं शोकोद्गार प्रगट करतांना व त्याचप्रमाणें आर्यन एक्सेलशिअर लीगच्या विद्यमानें नामदार कामत यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबईंत भरलेल्या काशीनाथपंतांच्या निधनाविषयींच्या दुखवट्याच्या जाहीर सभेंत अनेक विद्वान् वक्त्यांनीं आपल्या भाषणांत केला आहे. त्यावरून काशीनाथपंतांच्या मृत्यूनें केवढी हानि झाली आहे हें कळून येण्यासारखें आहे.

काशीनाथपंतांची प्रकृति मूळचीच अशक्त. वेंगुर्ल्यास असतांना त्यांनां छातींत कांहीं विकार झाला होता व त्यावर ऑपरेशन करून घेण्यासाठीं ते सावंतवाडीस त्या वेळचे तेथील लोकप्रिय डॉक्टर डालगॅडो यांजकडे गेले होते. आयुष्याचीं सर्व वर्षें त्यांनीं परिश्रम करण्यांतच घालविलीं. 'मनोरंजन' काढल्यापासून त्यांनीं पूर्ण विश्रांति अशी कधीं घेतलीच नाहीं. हवापालट करण्यासाठीं ह्मणून ते केव्हांकेव्हां बाहेरगांवीं जात, पण तेथेंदेखील 'मनोरंजना'विषयींच्या विचारांचा व्याप ते आपल्याबरोबर घेऊन जात. त्यांच्या मनांत कांहींना कांहीं योजना नेहमीं चालूच असत. अलीकडे चार सहा महिने त्यांची प्रकृति फारच खालावली होती व हवेसाठीं ह्मणून ते वेंगुर्ल्यास जाऊन राहिले होते; परंतु त्या वेळीं एक नमुनेदार वर्तमानपत्र काढण्याची त्यांच्या मनांत घोळत असलेली योजना इतकी प्रबळ झाली, कीं, प्रकृतीची पर्वा न करतां ते वेंगुर्ल्याहून उठून गेल्या मेमध्यें मुंबईस आले, व त्यानंतर पंधरा दिवसांनीं लोणावळ्यास जाईपर्यंत तो विचार त्यांच्या मनांत चालूच होता. गेल्या इन्फ्लुएन्झांत त्यांच्या जिवावरचें दुखणें गेलें. त्यांतून ते बरे झाले परंतु क्षीण झालेली प्रकृति रोगमुक्त झाली नाहीं. त्यांत सहा महिन्यांपूर्वीं प्रियपत्नीच्या अकालीं झालेल्या मृत्यूमुळें त्यांच्या मनास जबरदस्त धक्का बसला. त्यांच्या विलक्षण धीराच्या स्वभावास अनुसरून त्यांनीं तो बाहेर दिसूं दिला नाहीं. पण त्या वेळेपासूनच त्यांची प्रकृति खालावत चालली. तथापि त्यांच्या लिमिटेड कंपनी उभारण्याच्या, 'मनोरंजना'ला स्वतंत्र इमारत तयार करून देण्याच्या वगैरे योजना चालल्याच होत्या. विडीचें व्यसन त्यांनां पूर्वीं नव्हतें, एवढेंच नव्हे तर कोणी जवळ विडी ओढली तर त्यांनां राग येत असे; पण पुढें तेंच व्यसन त्यांनां अतिरिक्त जडलें; सारा दिवस काम करीत बसावयाचें, व्यायाम कधीं घ्यावयाचा नाहीं, असें वर्षानुवर्ष चाललेलें; या दोन्हीं कारणामुळें त्यांनां अपचनाचा विकार जडला. अलीकडे चारपांच वर्षें या विकारानें त्यांनां हैराण केलें होतें. त्यांत इन्फ्लुएन्झाच्या भयंकर दुखण्यानें भर घातली, व त्यांच्या पचनेंद्रियांत व उदरांत बिघाड झाला. त्यांच्या उदरांत आढळून आलेल्या भयंकर कॅन्सरचा उद्भव बरेच दिवसांपूर्वीं झाला असावा. पण तो शेवटपर्यंत उघडकीस आला नाहीं. त्यांनीं पुष्कळ डॉक्टरांचे, वैद्यांचे व होमिओपाथी, नेचरोपाथी वगैरे अनेक नवीन चिकित्सापद्धतींचे उपाय केले; परंतु कशानेंहि आराम वाटला नाहीं. शेवटीं डॉक्टरांच्या सल्ल्याप्रमाणें त्यांनीं ऑपरेशन करून घेण्याचें ठरविलें. तत्पूर्वीं आठदहा दिवस आपल्या कामकाजाची वगैरे सर्व नीट व्यवस्था केली. मनोरंजनाच्या पंचविसाव्या वर्षाचा शेवटचा अंक स्वतः सर्व पाहून छापण्यास हुकूम दिला, व ता. १९ जून रोजीं ते ऑपरेशन करून घेण्यास समाधान वृत्तीनें व शांत वृत्तीनें तयार झाले. श्रीयुत डॉ. गोपाळराव देशमुख यांनीं अत्यंत कुशलतेनें ऑपरेशन केलें; परंतु कॅन्सरची वाढ सर्व कापून काढणें अशक्य आहे असें आढळून आल्यामुळें जितका रोग



अनुक्रमणिका

कापून काढतां आला तेवढा त्यांनीं काढला. यानंतर चार दिवस ते बरे होते, व थोडी सुधारणाहि दिसत होती; परंतु शरीरांत शक्ति बिलकूल राहिली नव्हती. ता. २३ जून रोजीं दुपारीं शक्तिपात होऊं लागला, नाडी मंद होऊं लागली, हृदयाचें चलन थांबूं लागलें व ३॥ वाजतां त्यांचें प्राणोत्क्रमण झालें ! आपला मृत्यु सन्निध आला आहे हें त्यांनां कळलें होतें; परंतु त्याविषयीं त्यांनां यत्किंचित्‌हि भीति वाटत नव्हती. त्यांची वृत्ति अगदीं शांत व मन समाधान स्थितींत होतें, व प्राणोत्क्रमण झाल्यावर तेंच समाधान त्यांच्या मुद्रेवर विलसत होतें. त्यांच्या प्रेतयात्रेस पुष्कळ थोरथोर मंडळी आली होती. त्यांच्या देहास अग्निसंस्कार करण्यापूर्वी श्रीयुत नारायण मल्हार जोशी, श्रीयुत दिनकर सखाराम वर्दे वगैरे मंडळींचीं काशीनाथपंतांच्या गुणवर्णनपर भाषणें झालीं. अगदीं गरीब स्थितींतला मनुष्यदेखील सत्यसंकल्पाच्या बलावर केवळ सतत उद्योग करून देशसेवा करण्याचें आपलें ध्येय कसें साध्य करूं शकतो हें काशीनाथपंतांच्या चरित्रावरून दिसून येतें.

परमेश्वर काशीनाथपंतांच्या आत्म्यास शांति देवो !

# मातृभूमीच्या उद्धारकाचा परलोकवास.

हिंदभूमींतून एक महापुरुष निघून गेला. जनतेला जो आपुली लागत होता, व जनतेनें ज्याला आपला म्हटलें होतें, असा दीनवाण्या हिंदी जनतेच्या कुटुंबांतील एक मोठा कर्ता पुरुष नाहींसा झाला. टिळकांचे मार्ग व मतें कोणाला पसंत असोत अगर नसोत, परंतु त्यांची स्वदेशभक्ति अत्यंत उज्ज्वल होती; त्यांच्या ठायीं निःसीम स्वार्थत्याग बाणलेला होता; अवनतीच्या पंकांत लोळत पडलेल्या मातृभूमीचा उद्धार करण्याची तळमळ त्यांच्या चित्तास अहर्निश लागून राहिलेली होती; ह्या गोष्टी कोणालाहि नाकबूल करतां यावयाच्या नाहींत. चौसष्ट वर्षांच्या आयुष्यांत त्यांनीं फार मोठें कार्य केलें. आपल्या देशबांधवांच्या मनांत जागृति उत्पन्न केली, आणि आधुनिक भारतवर्षाच्या राजकीय इतिहासांत आपलें नांव चिरस्मरणीय करून ठेवलें. आसेतु हिमाचलांत ज्याचें नांव सर्व लोकांच्या मुखीं झालेलें आहे असा आधुनिक हिंदी पुढाऱ्यांत दुसरा झाला नाहीं, असे त्यांच्या पश्चात् केसरीनें जे उद्गार काढले ती अतिशयोक्ति आहे असें म्हणतां येणार नाहीं. लोकांच्या मनांत आपल्या उन्नतीसाटीं झटणाऱ्या पुढाऱ्यांविषयीं केवढें दांडगें प्रेम असतें याची साक्ष मुंबईंत त्यांच्या शेवटच्या यात्रेचे वेळीं जमलेल्या अत्यंत प्रचंड लोकसमुदायानें दाखवून दिली. त्यांच्या विद्वत्तेची कीर्ति तर त्रिखंडांत झालेली आहे. त्यांचें केसरी पत्र हें त्यांच्या संपादकीय कार्याच्या कुशलतेची उत्तम साक्ष आहे. त्यांच्या मृत्यूनें हिंदी राष्ट्राची त्याच्या इतिहासांतील अत्यंत महत्त्वाच्या वेळीं फार मोठी हानि झालेली आहे. परमेश्वर त्यांच्या आत्म्यास शांति देवो.

आमचा सर्व अंक आधींच तयार झाला असल्यामुळें टिळकांचें गुणवर्णन पुढील अंकावर टाकणें भाग आहे. आजच्या अंकांत मनोरंजनाचे फोटोग्राफर मित्र, श्रीयुत कीर्तिकर यांनीं टिळकांचा घेतलेला खास फोटोग्राफ व त्याचप्रमाणें त्यांच्या अखेरच्या यात्रेच्या वेळच्या प्रचण्ड लोकसमुदायाच्या दृश्याचा फोटोग्राफ अशीं दोन चित्रें दिलीं आहेत.




अनुक्रमणिका




*He alone is happy who can say,*
*Welcome life, whatever it brings,*
*Welcome death whatever it is.*

( १ )

कोणतेंही विशेष कार्य हातीं घेतल्यावर त्या कार्याला वाहिलेलीं माणसें कार्याच्या यशाची निश्चिति दर्शवितात. कार्य निर्दोष असलें, लोकहितकारी असलें, तरी तेवढ्यानें भागत नाहीं. पुष्कळ सत्कार्यें यशस्वी रीतीनें तडीस जात नाहींत; उलटपक्षीं सदोष कार्यांस यश माळ घालिते याचें कारण तरी हेंच होय. हें जसें कार्यासंबंधानें त्याचप्रमाणें कार्य करणारे जे त्याविषयींही अनुभव असाच आहे. निश्चयाचें बळ, चिकाटी, उद्यमशीलता, दूरदृष्टी ह्यांच्या अभावीं कोणीही हातीं घेतलेल्या कार्यांत यश प्राप्त करून घेण्याची आशा करूं नये. आमचे व्यवसायबंधु, मित्र व हितचिंतक रा. रा. काशीनाथ रघुनाथ मित्र हे वरील वर्गांत मोडणारे गृहस्थ होते. त्यांच्यांतीलें कांहीं विशेष गुणांची ओळख करून घेण्याचा अल्प प्रयत्न ह्या लेखांत केला आहे.

काशीनाथ रघुनाथ मित्र ह्याचें खरें उपनांव आजगांवकर असून त्यांचे बंधु तें अद्यापपर्यंत लावीत असत. परंतु असें सांगतात कीं आपल्या गांवीं असतांना राजेंद्रलाल मित्र ह्यांच्या नांवावरून तें नांव आपणही घेण्याचा त्यांनीं निश्चय केला. नवें उपनांव घेण्यास हें कारण पुरेंसें नाहीं. तथापि काशीनाथपंतांचें बंगाली वाङ्मयाकडे प्रथम प्रथम विशेष लक्ष असल्यामुळें त्यांनीं हें बंगाली नांव घेतलें असल्यास नकळे. मुंबईस येण्यापूर्वी ते अगदीं कमी पगारावर वेंगुर्लें येथें मराठी शाळेंत शिक्षक होते. तेथें असतांच एकदां त्यांच्या हातीं मुंबई समाचार पत्र पडलें. त्या पत्राचा तो मोठा आकार, मोठमोठीं आर्टिकलें, मोठमोठीं हेडिंगें, अगदीं ताज्या तारा, सर्वप्रकारच्या बातम्या वगैरे पाहून अशा प्रकारचें मोठें पत्र आपल्या देशांतील माणसें जेथें काढीत आहेत तेथें जाऊन त्या धंद्यांत पडण्याचा त्यांनीं निश्चय केला व ते २५ वर्षांपूर्वी मुंबईस आले येथें आल्यावर त्यांनीं अनेक प्रकारचे लहान लहान उद्योग केले. ‘ प्रभाकर ’ नामक दैनिक पत्र नुकतेंच रा. खंडेराव भिकाजी बलसरे ह्यांनीं घेतलें होतें. तेथें काशीनाथपंत रिपोर्टर म्हणून काम करूं लागले. ह्यांस लघुलिपि येत नव्हती. परंतु हे भाषणांतील मुख्य मुख्य वाक्यें मोडी लिपीमध्यें भराभर उतरून घेत व त्यांच्या आधारें सुसंगत असे भाषण लिहून काढीत. न्या. मू. रानडे ह्यांची कांहीं व्याख्यानें त्यांनीं लिहिलीं होतीं. हा उद्योग चालू असतानांच त्यांनीं मासिक मनो-



अनुक्रमणिका

रंजन हें मासिक काढलें. प्रथम पासूनच मनोरंजनाचें ध्येय नंतर दिसून आलें त्याप्रमाणें उच्च नव्हतें. गुजराती भाषेशीं काशीनाथ पंतांनीं बराच परिचय केलेला होता. त्यावेळीं त्या भाषेत "मासिक मजाह" ह्या नांवाचें एक मासिक चालू होतें. तें पाहून रा. मित्रांनीं "मासिक मौज" हें नांव देऊन मासिक काढण्याचें ठरविलें; परंतु गुजराती मासिकाच्या संपादकांनीं हरकत घेतल्यावरून त्यांनीं "मौज"च्या ऐवजीं "मनोरंजन" हा शब्द घालून माजगांव प्रिंटिंग प्रेसमध्यें, मासिक छापावयास प्रारंभ केला. ह्यावरून असें दिसून येईल कीं, प्रथम तरी गंभीर विचारांनीं भरलेलें मासिक काढण्याचा त्यांचा विचार नव्हता. पहिल्या कांहीं महिन्यांचे अंक पहातां वरील विधानाची सत्यता पटण्यासारखी आहे. आम्हांला असें स्मरतें कीं, एका मिशन स्कूलमध्यें शिक्षक व पंडित ह्मणून असलेले व वक्तृत्व सभांमध्यें व्याख्यानें देऊन बक्षिसें मिळविणारे रा. रा. केशव वामन पेठे ह्यांचा रा. मित्रांस बराच सहवास असे. व त्यांच्या सांगण्यावरून सामाजिक परिषद ह्या संस्थेची जेणेंकरून हेटाळणी होईल असें एक चित्रही काशीनाथपंतांनीं मनोरंजनामध्यें प्रसिद्ध केलें होतें! परंतु हा परावलंबीपणा फार महिने टिकला नाहीं, व पुढें त्यांनीं (१) सत्य संकल्पाचा दाता भगवान । सर्वकरीं पूर्ण मनोरथ व (२) यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवतः हीं दोन ध्येयें आपल्यापुढें ठेवून त्या ध्येयांच्या साधनासाठीं सर्व उद्योग केले; परोपकाराचीं कार्यें त्यांनीं बिनबोभाट केलीं, व योग्य व्यवस्था ठेवून हातीं घेतलेलीं कार्यें सर्वांस नमुनेदार अशीं करून ठेविलीं. केवळ ग्रंथप्रकाशनाचीच बाब आपण प्रथम घेऊं. निर्धन काशीनाथपंत मुंबईसारख्या बकाल शहरीं जवळ ज्ञानाची पुंजी बेताबाताचीच घेऊन येतात काय व २५ वर्षांच्या अवधींत शंभराहून अधिक ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें सामर्थ्य त्यांच्यामध्यें येतें तें कशामुळें? मनोरंजनासारखें मासिक सतत २५ वर्षें चालविणें ही कांहीं लहान सहान गोष्ट नव्हे. ते स्वतः विद्वान नव्हते, बहुश्रुत नव्हते; एखाद्या कठिण विषयाचें अध्ययन करून त्यावर स्वतंत्र लेख लिहिण्याचें सामर्थ्यही त्यांच्यात नव्हतें. तरी ते उत्तम लेखक होते. गुजराती, व बंगाली भाषांतील कित्येक लेख, गोष्टी व कादंबऱ्यांस त्यांनीं मराठी भाषेचा चांगला पेहराव चढविला आहे. सारांश, काशीनाथपंतांचें मासिक, काशीनाथपंतांनीं प्रसिद्ध केलेला ग्रंथसंग्रह, काशीनाथपंतांनीं काढलेला व उत्तम रीतीनें चालविलेला मनोरंजन छापखाना ह्यांकडे पहातां हें एवढें यश त्यांस कसें प्राप्त झालें याचें प्रथम आश्चर्य वाटतें पण त्यांच्यांतील विशेष गुणांची ओळख पटत गेली, ह्मणजे काशीनाथपंतांविषयीं आदर, अभिमान व प्रेम हीं वाढूं लागतात.

काशीनाथपंतांचा पहिला गुण ह्मणजे त्यांचें **निर्धाराचें वर्तन.** ह्या गुणाच्या अभावीं ते अगदींच पंगु झाले असते. निश्चयाचें बळ । तुका ह्मणे तेंचि फळ ॥ असें आपण वारंवार ह्मणतों व ह्मटलेलें ऐकतों; परंतु हा गुण प्रत्यक्ष पाहून मनावर जितका परिणाम होतो तितका वचन ऐकून होत नाहीं. प्रकाशनाच्या व्यवसायांत पडल्यावर त्यांच्या मार्गांत अनेक अडचणी येत गेल्या; पण त्यांस न जुमानतां ते मार्ग क्रमीत गेले. लेखकांची वाण, पैशाची टंचाई, छापखान्यांची दिरंगाई, अशा एक ना दोन, किती तरी अडचणी मार्गांत आल्या, परंतु काशीनाथपंत दिवसें दिवस पुढेंच पाऊल टाकीत चालले. छपाई उत्तम करावयाची, अंक वेळेवर काढावयाचे ह्या व्रताचें पालन त्यांस इतकें जाचलें तरी त्यांनीं माघार घेतली नाहीं; हा छापखाना नाहीं तर तो, एक नाहीं तर दुसरा, एकानें काम होत नाहीं, तर दोन असें केलें व एकदां तर टाइम्स सारख्या परक्या लोकांनीं चालविलेल्या छापखान्यांतही ते आपलें मासिक छापून घेऊं लागले. ही त्यांची चिकाटी असामान्य होती. ह्या गुणाच्या अभावीं त्यांची कर्तृत्वशक्ति पंगु झाली असती.





अनुक्रमणिका

त्यांचा दुसरा गुण ह्मणजे **परमेश्वरावरील दृढ विश्वास.** हें जरा त्यांच्याशीं विशेष संबंध असणारांसही प्रथमदर्शनीं चमत्कारिक वाटण्याचा संभव आहे. काशीनाथपंत देवदेव करणारे नव्हते; ते स्वतः विचार करणारे होते. ते विद्वान नव्हते, पण सुविचारी होते; त्यामुळें त्यांचा सर्व ओढा उदार विचारांकडे होता. ते प्रथम वामनराव जोशांच्या आर्य सभेचे सभासद होते व नंतर कित्येक वर्षें आर्य समाजाचे सभासद होते. आर्यसमाजानें त्यांच्या विवेचक बुद्धीचें, त्यांच्या धर्मभावनेचें, समाधान होईना, ह्मणून ते प्रार्थनासमाजाचे सभासद झाले. त्यांच्यावर व्यवसायांत असतांना संकटें आलीं. पण त्यांचा परमेश्वरावरील विश्वास ढळला नाहीं; त्यांचे एक अतिनिकटचे स्नेही वारले, पण ते हतबुद्ध व हतवीर्य न होतां कर्तव्यरत राहिले; त्यांचा मोठा संसार संभाळणारी त्यांची सहचारिणी हां हां ह्मणतां त्यांस सोडून गेली, पण त्यांचा परमेश्वरावरील भाव उडाला नाहीं. मरण जवळ आलें आहे याची खात्री; लहान लहान मुलें पोरकीं होणार हें स्पष्ट दिसत होतें; कार्याचा पसारा आटपशीर नाहीं हें माहीत; तरी सुद्धां ते डगमगले नाहींत; माझी शांति कायम आहे; माझें धैर्य खचलेलें नाहीं; माझ्या मागें माझ्या मुलांचें कसें होईल ही चिंता आतां मी करीत नाहीं; माझा परमेश्वर सर्व कांहीं पाहून घेईल हा त्यांचा विश्वास शेवटपर्यंत होता. हा असा त्यांचा विश्वास होता ह्मणून त्यांच्या ठिकाणीं उज्ज्वल आत्मविश्वासही वसत होता. मी कधींही कोणाचें, जाणून बुजून अकल्याण केलें नाहीं व कल्याणाच्या मार्गाचाच मी सर्वांस बोध करीत आलों आहे असें त्यांनीं एकदां ह्मटलें. इतकें असूनही ज्यांनीं मला चिकटून असावयास पाहिजे, ते मजपासून दूर होत असले, तरी सुद्धां मी अस्वस्थ होणार नाहीं. कारण, परमेश्वरच त्यांस योग्य मार्ग दाखवील असें त्यांनीं एकदां स्पष्ट ह्मटलें. असें जेव्हां त्यांनीं ह्मटलें त्यावेळीं ते भग्नकाय होऊन मृत्युशय्येवर पडले होते; जवळ डॉ. भांडारकर ह्यांचे धर्मपर लेख व व्याख्यानें हें पुस्तक उघडलेलें पडलें होतें व "भाव अथवा परमेश्वर प्राप्तीचा उपाय" हें व्याख्यान ते वाचीत असावे असें दिसत होतें. माझी येथील यात्रा संपली हें जाणूनच मी आहें, तरी पण मला आतां मागील गोष्टींविषयीं तळमळ लागत नाहीं, कारण, मी नित्य आपल्या कर्तव्यास जाणून परमेश्वरास स्मरून व त्यास साक्ष ठेवून वागण्याचा प्रयत्न केला आहे. आतां मला भीति कशाची? हे उद्गार त्यांचा परमेश्वरावरील दृढ विश्वासच पटवून देतात. ह्या विश्वासाच्या जोरावर त्यांनीं बिकट मार्ग आक्रमिला.

**सामाजिक प्रगतीविषयींची त्यांची तळमळ**—हा त्यांचा गुण शांतपणें त्यांच्याशीं संभाषण करतानां दृगोचर होत असे. काशीनाथपंत स्वतंत्रपणें विचार करणारे होते. त्यामुळें आपल्या सामाजिक दुर्गतीचें मूल त्यांस असें दिसून आलें होते कीं, आमची सर्व चळवळ एकतर्फी होत आहे. आम्ही आमच्या बायकांना नांवाच्या सहधर्मचारिणी म्हणतों, परंतु त्यांच्या उन्नतीची यत्किंचितही आस्था आम्ही दाखवीत नाहीं. जोंपर्यंत आमच्या स्त्रिया ज्ञानसंपन्न होणार नाहींत, जोंपर्यंत अनेक दुष्ट रूढींच्या दास्यत्वांतून त्यांची मुक्तता होणार नाहीं; जोंपर्यंत स्वतःसाठीं संसारातील अत्यंत बिकट बाबतींत स्वतः विचार करण्याचें सामर्थ्य त्यांच्यांत आम्ही आणणार नाहीं, ज्ञानाची गोडी त्यांच्यामध्यें उत्पन्न करून महाराष्ट्रामध्यें सर्व बाबतींत समविचारी कुटुंबें दिसूं लागणार नाहींत तोंपर्यंत सर्व कांहीं व्यर्थ आहे. पुरुषांच्या व स्त्रियांच्या विचारांतील अंतर, आचारांतील अंतर, ज्ञानांतील अंतर हें सर्व गेल्यावांचून समभाव नांदणार कसा? सम व्यवसायांमध्यें पतिपत्नी निमग्न होणार कशीं? त्यांच्या मासिकाचे पंचवीस वर्षांचे अंक काढून पहा. स्त्रियांच्या उन्नतीच्या कळकळीचा धागा सारखा सर्वत्र दिसेल. कन्या, तरुणी, पत्नी, माता, भगिनी, विधवा, वृद्धा अशा सर्व स्थितींतल्या स्त्रियांच्या कल्याणासाठीं त्यांचे सर्व प्रयत्न.




अनुक्रमणिका

त्यांचें कोमल अंतःकरण त्यांच्या उन्नतीसाठीं तिळतिळ तुटत असे व त्यांच्या कल्याणाच्या कार्यी हातभार लावावयास ते नित्य तयार असत. अनाथबालिकाश्रमाचा वार्षिक रिपोर्ट ते आपल्या खर्चानें कितीतरी वर्षें छापीत व आपल्या अंकाबरोबर वाटीत असत.

त्यांची उद्यमशीलता असामान्य तर होतीच, पण त्यांच्या धंद्यातील त्यांची **कल्पकता** विशेष प्रसंशनीय होती त्यांनीं काढलेले दिवाळी अंक, वसंत अंक, कर्वे अंक पहा; त्यांनीं प्रसिद्ध पुरुषांच्या घेतलेल्या मुलाखती पहा; त्यांची विषयांची निवड पहा; त्यांची छपाई पहा; त्यांची लेखकांची निवड पहा; त्यांनीं प्रसिद्ध केलेली पुस्तकें पहा, त्यांची कल्पकता सर्वत्र दिसे. आपल्या हातून जीं कार्यें होतील तीं चांगली व्हावीं व सर्व कार्यें देशहितकारक अशी असावीं अशा धोरणानें ते वागत. हातीं घेतलेलें काम उत्तम रीतीनें पार पडेपर्यंत त्यांस विश्रांति कशी तीं माहीत नसे. रात्रीचा दिवस करून, प्रकृतीकडे न पहातां, भूक तहान बाजूस सारून ते कामास लागत व काम आटो-क्यांत आणीत. ही त्यांची चिकाटी, हा त्यांचा बाणेदारपणा, ही त्यांची तडफ पाहून त्यांच्याविषयीं प्रेम व आदर जागृत न होणें अशक्यच होतें म्हटलें तरी चालेल.

आतां दोन गोष्टीसंबंधानें येथें उल्लेख केला पाहिजे. काशीनाथपंतांचें **मातृभाषेवर उत्कट प्रेम** होतें. आपल्या मराठी भाषेमध्यें उत्तमोत्तम ग्रंथ व्हावेत, ज्या भाषांमध्यें चांगलें, सद्विचारपरिपूर्ण ग्रंथ आहेत त्यांचीं मराठी भाषेंत चांगलीं रूपांतरें व्हावीत ही त्याची मोठी महत्त्वाकांक्षा होती. म्हणून त्यांनीं १०० हून अधिक ग्रंथ प्रसिद्ध केले; कित्येक होतकरू लेखकांस हाताशीं धेऊन त्यांच्याकडून लेख लिहवून घेतले व अशाप्रकारें आपलें मासिक व ग्रंथप्रकाशन त्यांच्याद्वारें त्यांनीं आपल्या मातृभाषेची एकनिष्ठ सेवा बजाविली.

त्यांचा **व्यवस्थितपणा** व **टापटीप** हे गुण अत्यंत वाखाणण्यासारखे होते. त्यांनीं आपल्या मासि-काचा इतका मोठा व्याप वाढविला, इतके ग्रंथ प्रसिद्ध केले, एवढा मोठा छापखाना घातला, पण अव्यवस्थित-पणा त्यांच्या कारभारांत कोणासही दिसला नाहीं त्यांचे सर्व हिशेब चोख आहेत. येणें व देणें ह्या दोन्ही बाबतींत त्यांच्या व्यवहारांत चूक सांपडावयाची नाहीं. आपण ह्या दुखण्यांतून उठत नाहीं हें ते जाणून होते. म्हणून मागें त्यांनीं सर्व व्यवस्था अगदीं चोख करून ठेविली आहे. कोणी कोठलीं कामें करावयाचीं, कोणावर कोणतीं कामें सोंपावयाचीं, आपल्या सर्व कामांची कशी व्यवस्था लावावयाची, आपले सर्व बेत कोणकोणत्या मार्गानें गेल्यानें पूर्ण होणें शक्य आहे ह्या सर्वांचें शिस्तवार टांचण त्यांनीं करून ठेविलें आहे. मात्र खेदाची गोष्ट इतकीच कीं, व्यवहारांतील व्यवस्थितपणा त्यांनीं आपल्या स्वतः संबंधानें राखला नाहीं. मोठ्या थोरल्या कारखान्याचीं कामें सुव्यवस्थित व्हावीं म्हणून त्यांच्या मध्यें अव्यवस्थितपणा आला! स्वतः संबंधानें काळजी घेण्याची त्यांस अवश्यकता वाटली नाहीं. नमुनेदार मासिक काढलें, महाराष्ट्रास तें ललामभूत झालें, छापखाना सुरू करणें व तो लोकादरास पात्र होणें ह्या दोन्ही गोष्टी एकाच वेळीं झाल्या; परंतु महाराष्ट्राचे मित्र अल्पायुषी झाले; एवढ्या थोरल्या व्यवहाराचें धुरिणत्व त्यांनीं लिहून ठेविलेल्या कागदांवरील सूचनांच्या हातीं आलें, व महाराष्ट्र एका कर्तबगार, उद्योगी, कल्पक, शीलवान, कर्तव्यनिष्ठ, विचारी व पापभीरू सेवकास अंतरला! हें महाराष्ट्राचें, मराठी भाषेचें, मनोरंजक मासिकाचें झालेलें नुकसान भरून येण्या सारखें नाहीं.

श्रीसमर्थ रामदासांच्या मनाच्या श्लोकांमध्यें

मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें। मना बोलणें नीच सोसीत जावें।
स्वयें सर्वदा नम्र वाचे वदावें। मना सर्व लोकांसि रे नीववावें॥




अनुक्रमणिका

हा जो एक श्लोक आहे तो रा. काशीनाथपंत ह्यांच्या चरित्राकडे पहातां त्यांस पुष्कळ अंशानें लागू होतो असें दिसून येईल. त्यांच्या ठिकाणीं धैर्य हा गुण जर नसता, तर त्यांच्या हातून इतकें कार्य झालें नसतें. त्यांचा स्वभाव शांत होता असें पुष्कळ ह्मणतात, पण तो किती शांत असे हें त्यांच्याशीं निकट संबध असणारांच कळे. त्यांनीं आपल्या मित्रांस न आवडण्यासारखी एखादी गोष्ट केली तर त्यांचे मित्र त्यांजवर तुटून पडत, त्यांची निर्भर्त्सना करीत, पण काशीनाथपंतांनीं सर्व कांहीं शांतपणें ऐकून घ्यावें, थोडेसें गालांतल्या गालांत हंसावें व उद्यां आपण ह्या संबंधानें बोलूं असें ह्मणून मित्रांस वाटेला लावावें व दुसऱ्या दिवशीं मित्रांच्या घरीं जाऊन त्यांची समजूत घालावी ! स्वतः कडु शब्द न उच्चारितां आपल्या विनम्रशील वर्तनानें ते सर्वांस आपल्याकडे आकर्षून घेत. "दुसऱ्याच्या दुःखें दुःखवावें । परसंतोषें सुखी व्हावें । प्राणीमात्रांस मेळऊन घ्यावें ! बऱ्या शब्दें" हेंही काशीनाथपंतांनीं आपल्या आचरणाच्याद्वारें खरें करून दाखविलें, हें त्यांच्याशीं वारंवार संबंध येणारांस अनुभवानें कळून चुकलें आहे. मृत्युशय्येवर असतांही आपल्याच धंद्यांतील होतकरू तरुणांस त्यांनीं योग्य उपदेश दिल्याचें आम्हांस माहीत आहे. सारांश, दुसऱ्याच्या दुःखानें दुःखी होऊन तीं दुःखें हरण करीत, परोत्कर्षामुळें मत्सरी न होतां, आपल्या विनयशील स्वभावानें, गोड शब्दांनीं व मुधर आचरणानें ते सर्वांचे मित्र झाले होते.

आपल्यामध्यें कांहीं विशेष सामर्थ्य नाहीं, आपलें ज्ञान अल्प, कर्तृत्वशक्ति अल्प, साधनांची प्रतिकूलता, बहुजनसमाजांत अप्रसिद्धि असें म्हणून आपल्या दुबळेपणाचें रडगाणें गाणारीं माणसें व्यवहारांत नित्य आढळतात. काशीनाथपंतांजवळ सर्व साहित्य तुटपुंजें होतें व हें ते जाणून होते; परंतु दीर्घ प्रयत्नानें त्यांची कर्तृत्वशक्ति वाढली, आपत्ति, विपत्ति व कृतघ्नपणा यांशीं झुंजून ते धैर्यशील बनले; निरनिराळ्या स्वभावांच्या माणसांची पारख करून करून ते मोठे गुणज्ञ झाले; नामदार गोखले सारख्यांचें उदाहरण पाहून त्यांच्या कित्येक विचारांस स्थिरता प्राप्त झाली; सर रामकृष्णपंत ह्यांचें चरित्र व उद्गार त्यांस आदर्शवत् झाले; त्यांची वृत्ति शांत बनली; कोणीही कितीही त्यांच्यावर त्रागा केला, तरी आपली शांति तिळमात्र ढळूं न देतां दुसऱ्यांचा राग घालवावयास ते शिकले; त्यांचा सौम्य स्वभाव, त्यांचा विनम्रपणा, त्यांची सामाजिक प्रगतीसंबंधाची तळमळ, त्यांची सत्यनिष्ठा व त्यांची धैर्यशील वृत्ति हीं सर्व त्यांच्याशीं निकट संबंध येणारांस आदर्शवत् झालीं. साधारण स्थितींतील, पण सच्छील मनुष्याच्या हातून योग्य मार्गांचें अवलंबन केल्यास किती मोठीं कार्यें होऊं शकतात त्याचें काशीनाथपंत प्रत्यक्ष उदाहरण आहेत. त्यांच्यांतील हे गुण, व त्यांचें चरित्र महाराष्ट्रास स्फूर्तिजनक होवोत अशी परमेश्वरापाशीं प्रार्थना करून हा लेख संपवितों.

---

## लोकमत.

[ रा. रा. काशीनाथपंत मित्र ह्यांनीं सतत २५ वर्षें रात्रंदिवस राबून महाराष्ट्राची जी सेवा बजाविली ती व्यर्थ गेली नाहीं व त्या सेवेचें महत्त्व फार आहे याची जाणीव लोकांच्या ठिकाणीं आहे हें त्यांच्या संबंधानें ना. कामत ह्यांच्या अध्यक्षतेखालीं जी जाहिर सभा झाली व त्यावेळीं जीं भाषणें झालीं त्यांवरून स्पष्ट होत आहे. त्यांच्या कार्यासंबंधानें व त्यांच्यांतील विशेष गुणांविषयीं पुढें आम्ही कांहीं अभिप्राय देत आहों. त्यांवरून रा. मित्रांच्या मृत्युमुळें महाराष्ट्राच्या हानीची कल्पना होईल. सं. ]



अनुक्रमणिका




(२)

**मनोरंजनाचे** कर्ते, लोकांतराप्रत गेलेले **काशीनाथ रघुनाथ मित्र** यांच्या मृत्यूमुळें महाराष्ट्राचें नुकसान जें झालें आहे तें भरून येणें फार कठीण आहे. त्यांच्यामध्यें अंगीकृत कार्याची निर्वाहकता विशेष रूपानें नांदत असे. ७७ वर्षें पर्यंत मी आरोग्यशाली राहून जगलों कसा याचें तत्त्व काढण्याकरतां अत्यंत श्रम करून मुंबईस व पुण्यास ( कांहीं वर्षांपूर्वी ) त्यांनीं माझ्या गांठी घेतल्या आणि नाना प्रकारचे प्रश्न मजला घालून आपलें अभिप्रेत तत्त्व त्यांनीं काढलें. साधारण ब्राम्हसमाजाचे चिटणीस प्राणकृष्ण आचार्य यांच्याही मनामध्यें मी इतकीं वर्षें जगलों याचें कारण समजून घेण्याची उत्सुकता उत्पन्न झाली. आणि त्यांनीं मला त्याविषयीं प्रश्न केला. तेव्हां मित्रांच्या मनोरंजनामध्यें छापलेल्या लेखाकडे मीं बोट दाखविलें मनोरंजन मासिक व तत्संबंधीं छापखाना घालण्याविषयीं त्यांनीं जे परिश्रम केले ते सर्वांस अनुकरणीय आहेत.

संगमाश्रम, पुणें.

[signature]

(३)

मनोरंजनाचे संपादक व मालक प. वा. रा. रा. काशीनाथ रघुनाथ मित्र यांचा व माझा जरी दृढ परिचय नव्हता, तरीपण आज पुष्कळ वर्षें त्यांचें चरित्र, त्यांचा उद्योग, संपादक व सुधारक या दृष्टीनें त्यांचीं केलेली कामगिरी हीं माझ्या दृष्टीसमोर असल्यामुळें मी त्यांची योग्यता जाणून आहें. ते एक शांतताप्रिय गृहस्थ होते व म्हणूनच विशेषप्रकारें लोकांपुढें येऊन आपल्या नांवाची झाली त्यापेक्षां अधिक प्रसिद्धि त्यांनीं करून घेतली नाहीं. परंतु त्यांची उद्यमशीलता, त्यांचें निर्धाराचें वर्तन, त्यांचा आत्मविश्वास व मराठी भाषेंतील संपादक व लेखक या नात्यानें आपल्या व्यवसायाची वाढ करण्याचें त्यांचें सामर्थ्य हे त्यांचे गुण उच्च दर्जाचे होते. दृढ प्रयत्न, व उत्साह यांच्या बळावर ते सुस्थितीप्रत आले व त्यांनीं मनोरंजन मासिकाची भरभराट केली आणि मराठी भाषेंतील ज्या वर्तमानपत्रांच्या व मासिकांच्या योगें महाराष्ट्रीय वाचकांमध्यें सद्ग्रंथाभिरुचि जागृत झाली त्यांत मनोरंजनासही त्यांनीं स्थळ करून दिलें. त्यांचा स्वभाव फार सौम्य, मनमिळाऊ व गोड होता त्यामुळें त्यांनीं पुष्कळसे लेखक आपल्या मासिकासाठीं मिळविले. त्यांचें चरित्र महाराष्ट्र सारस्वताच्या अभिमान्यांस व संपादकांस आदर्शवत् झालें आहे आणि त्यांच्या मृत्यूमुळें आपल्या इलाख्यांतील लेखनव्यवसाय व ग्रंथप्रकाशन यांचें फार मोठें नुकसान झालें आहे.

पेडर रोड, मुंबई.

N. J. Lahdavalkar






अनुक्रमणिका

काशीनाथपंतांच्या अंगीं एक प्रकारचा दृढ निश्चय, साहस, चिकाटी इत्यादि उत्तम गुण होतेच. व्यक्तिशः ते आपल्या खासगी मित्रांना एक प्रेमळ मित्रही होते. परंतु महाराष्ट्रानें जो त्यांच्या कामगिरीचा विचार करावयाचा तो त्यांनीं महाराष्ट्रासाठीं केलेल्या सेवेचा. त्यांनीं केलेली सेवा दोन प्रकारची होती. लेखक व प्रकाशक या नात्यानें त्यांनीं मराठी भाषेची, वाङ्मयाची आपल्या मासिक मनोरंजनाच्या द्वारें व ग्रंथप्रकाशनाच्या द्वारें आज पंचवीस वर्षे बहुमोल सेवा केली याबद्दल शंका नाहींच! या दृष्टीनें बहुतेक वक्त्यांच्या भाषणांतून काशीनाथपंतासंबंधानें प्रशंसापर उद्गार आलेलेच आहेत. परंतु याहूनही विशेष त्यांची कामगिरी म्हणजे त्यांनी समाजसुधारक या नात्यानें आपल्या मासिकाच्या द्वारें सामाजिक सुधारणेची केलेली सेवा ही होय. वाङ्मयवृद्धीकरितां मराठी भाषेमध्यें अनेक मासिकें आहेत, तथापि मासिकाच्याद्वारें हिंदुसमाजांतील आचारविचार यांस नवीन वळण लावण्याचें काम प्रथमतः काशिनाथपंत यांनींच मनोरंजनाचें द्वारें अंगिकारलें असें म्हणण्यास चिंता नाहीं. ज्याप्रमाणें १८८० सालीं निबंधमालाकारांनीं आपल्या निबंधमालेच्याद्वारें मराठी भाषेची सेवा करून लोकांच्या विचारांस एक नवीन वळण लाविलें मग तें वळण बरें किंवा वाईट यासंबंधानें मतभेद असोत; अथवा ज्याप्रमाणें कै. आगरकर यांनीं आपल्या सुधारक पत्राच्या द्वारें जनतेच्या सामाजिक विचारास एक नवीन वळण लावण्याचा प्रयत्न केला, किंवा ज्याप्रमाणें कै. हरिभाऊ आपटे यांनीं आपल्या कादंबऱ्या व करमणूक या पत्राचे द्वारें समाजांतील चालीरीतींस नवीन दिशा लाविली, त्याचप्रमाणें कै. काशिनाथपंत मित्र यांनी आपल्या मनोरंजनाचे द्वारें हिंदुसमाजांतील चालीरीतींस, सामाजिक सुधारणेस एक प्रकारचें वळण लावण्याचा प्रयत्न केला यांत शंका नाहीं. या दृष्टीनें पाहतां मनोरंजन ही केवळ मराठी भाषेची संस्था नसून महाराष्ट्रांत समाजसुधारणेची ती एक शक्ति होती.

रा. मित्र यांनी आपल्या मनोरंजनास जे सर्वांगसुंदर रूप दिलें होतें तें पाश्चात्य देशांतील त्याच भर्तीच्या कोणत्याही मासिकास साजेल अशा प्रकारचें होतें. त्यांत विशेष हाच होता कीं, इतर देशांतील मासिकांप्रमाणें मुख्यतः व्यापारी दृष्टीनें द्रव्यार्जनावरतींच सर्व नजर न ठेवतां समाजसुधारणा व्हावी, व विशेषतः स्त्रियांची उन्नति व्हावी अशी रा. मित्र यांना अहर्निश तळमळ असून त्याप्रमाणें त्यांची उदात्त भावना होती. ते आपल्या मनांत नेहमीं उदारमतवादी असत. या नात्यानें महाराष्ट्राची त्यांच्या निधनानें बरीच हानी झाली आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

**बी. एस. कामत.**

(५)

रा. मित्रांविषयीं अधिकाराचे दोन शब्द लिहिण्याची माझी योग्यता नाहीं. साधारणपणें मराठी जाणणारांपैकीं मी एक आहें. परंतु महाराष्ट्रवाङ्मयाचा व महाराष्ट्रवाङ्मय सेवकांचा अभिमान असणारांपैकीं मी एक आहें. व या सेवकांमध्यें आपले मित्र श्रीयुत का. र. मित्र हे एकनिष्ठ सेवक होते यांत कांहीं संशय नाहीं. साधारण स्थितींत असूनही आपल्यापुढें उच्च ध्येय ठेवून मराठी वाङ्मयाची व महाराष्ट्रीय स्त्रीवर्गाची सेवा करावयाची अशा घोर प्रतिज्ञेनें श्री. का. र. मित्र यांनीं जेव्हां २५ वर्षांमागें आपलें मासिक मनोरंजन काढलें, त्यावेळीं आपल्या भाषेंत फारच थोडी मासिकें होतीं. विविधज्ञानविस्तारासारखीं भाषेनें व विचारसरणीनें गंभीर मासिकें वाचून समजण्याइतकीं आपल्या इकडील स्त्रियांची त्यावेळीं तरी प्रगति झालेली नव्हती. अशा वेळीं यत्र नार्यस्तु पूज्यन्ते तत्र रमन्ते देवतः हे




अनुक्रमणिका

आपलें ध्येय ठरवून स्त्रीजातीच्या पूजेस–सेवेस–मित्रांनीं सुरुवात केली व स्त्रियांस मनोरंजक तर खरेंच पण त्याबरोबरच निरनिराळ्या विषयांवरील माहितीचें ज्ञान–विवेचन–निबंध–गोष्टी–चुटके–काव्यें यांच्याद्वारें सहज करून देतां येईल अशी योजना आपल्या नवीन पाश्चात्य धर्तीवर काढलेल्या मासिकाच्या द्वारें केली. त्यावेळीं अशा प्रकारचें हें पहिलेंच मासिक निघालें व तें आपल्या नांवास साजेसें, करमणूक करणारें असल्यामुळें लवकरच सर्वांस प्रिय झालें व स्त्री वर्गास प्रसिद्ध होतील त्या कादंबऱ्या, व चटकदार परंतु खालच्या प्रतीच्या गोष्टींवरच जो सर्व भार ठेवावा लागत असे तो ह्यामुळें कमी कमी होत गेला. करमणूक होत असतांनाच सहज ज्ञानप्राप्ति होत असल्यामुळें एकंदर वाचनासंबंधीच्या अभिरुचीस निराळें वळण लागूं लागलें. व मित्रांच्या ह्या एकनिष्ठ सेवेचें हें फल त्यांस सर्वांशानें जरी नाहीं तरी कांहीं थोड्या अंशानें तरी त्यांच्या हयातींत मिळालें हा आनंदाची गोष्ट होय. आपलें मासिक खरोखर स्त्री वर्गामध्यें कसें जास्त उपयुक्त व प्रिय होईल या गोष्टीकडे त्यांचें सर्व लक्ष असे व हाच त्यांचा संकल्प असल्यामुळें इतर गोष्टींकडे त्यांस फारसें लक्ष द्यावयास होत नसे. सौम्यता व प्रेमलपणा हे त्यांच्यांतील विशेष गुण होते. कोणत्याही वेळीं बोलत असतां शांतपणें बोलणें, दुसऱ्यास आदरानें वागविणें वगैरे गुणांनीं ते आपल्या मित्र मंडळींतच काय पण मजसारख्या अल्प परिचितांसही प्रिय व अनुकरणीय वाटत असत. अलिकडे अलिकडे प्रकृति अस्वस्थ असतांनाही त्यांचा शांतपणा ढळला नव्हता. पत्नीच्या शेवटच्या आजारीपणांतच माझी त्यांची शेवटची भेट झाली. पत्नीचें दुखणें फार जोखमाचें आहे असें सांगितल्यानंतरही अगदीं शांतपणानें पुढें काय करावें या विषयीं ते मजशीं बोलत होते व हे गुण त्यांच्यामध्यें त्यांचें जें दुसरें ध्येय त्यामुळेंच आले असले पाहिजेत असें त्यावेळीं माझ्या लक्षांत आलें. ईश्वराचे ठिकाणीं दृढ निष्ठा व आपण जें करीत आहों तें सत्य आहे अशाबद्दल पूर्ण खात्री करून आचरण करीत असल्यामुळें त्यांस बलप्राप्ति होत असे. कोणत्याही प्रकारचें विशेष भांडवल नसतांही मासिक लहानशा प्रमाणावर सुरू केल्यापासून जी सारखी २५ वर्षे मेहेनत करून मोठा स्वतःच्या मालकीचा छापखाना त्यांनीं सुरू केला त्याचें रहस्य तरी याच त्यांच्या ध्येयांत नाहीं काय ? असे स्त्रीजातीचें कैवारीच नव्हत तर तन मन धन अर्पण करून सेवा करणारे सेवक आपणांस सोडून गेले आहेत—महाराष्ट्र भाषेचे सेवक नाहीसें झाले आहेत—ह्यामुळें आपणां सर्वांस अत्यंत दुःख होत आहे. परंतु अशा या थोर सेवकाच्या वियोगाच्या दुःखाचें पर्यवसान खरोखर त्याच्या ध्येयांचें साधन करण्याच्या प्रयत्नांत झालें तरच तें खरें दुःख. एकंदर स्त्रीवर्गाची सर्वांगीन उन्नति करून त्यांस पूजनीय-पूजापात्रकरणें व त्यांची पूजा करून ईश्वरास आळविणें—हें त्यांचें ध्येय आजकालच्या चळवळीच्या दिवसांत अत्यंत महत्वाचें आहे व त्याकडे योग्य दृष्टीनें पाहिलें तरच आपला खरा फायदा होण्याचा संभव आहे.

**काशीबाई नवरंगे.**

( ६ )

" रा. मित्रांची मी अनेक परीनें ऋणी आहें. माझ्या हातून जें थोडेसें लेखन झालें, त्यास त्यांचें प्रोत्साहनच कारण झालें. त्यांचें माझ्याशीं नेहमीं सौजन्ययुक्त वर्तन झालें असल्यामुळें मला त्यांचेविषयीं आदर व कृतज्ञता वाटत असे. स्त्रीवर्गासंबंधानें अक्षय्य उच्च भावना व प्रगतिपर प्रयत्न यांच्यायोगानें त्यांस इहलोकीं पुण्य व परलोकीं सद्गति मिळेल हाच माझा विश्वास आहे. "

**काशीबाई हेरलेकर.**




अनुक्रमणिका

(७)

"रा. मित्रांचा मृत्यु ही राष्ट्रहानि होय. एखादा अत्यंत उपयुक्त विषय हिंमतीनें अंगावर घेऊन तो दृढनिश्चयाचे बळावर कसा सिद्धिस न्यावा ही गोष्ट कै. मित्र ह्यांच्या उदाहरणावरून शिकण्यासारखी आहे. मनोरंजन हीच त्यांची उत्कृष्ट सेवा होय."

गो. स. सरदेसाई.

(८)

महाराष्ट्रांत वाचनाची गोडी उत्पन्न करणाऱ्या ज्या थोड्याशा संस्था गेल्या पंचवीस वर्षांत अस्तित्वांत आल्या, त्यांत मनोरंजनाला बराच वरचा नंबर द्यावा लागेल. प्रसिद्ध कादंबरीकार रा. रा. हरि नारायण आपटे यांच्या 'करमणूकी'नें महाराष्ट्राचें मन प्रथमतः ललितवाङ्मयाकडे ओढलें, हें जरी खरें असलें, तरी मनोरंजनाचा नंबर मागें पडत नाहीं. करमणुकीचें अंतरंग गोड असलें तरी बहिरंग अगदींच टाकाऊ असे. ही उणीव दूर करण्याचा विडा मनोरंजनानें उचलला, आणि पंचवीस वर्षांच्या आंतच विलायतेंतील स्ट्रॅंड, पीअर्सन, लंडन या प्रसिद्ध मासिकांच्या पंक्तीला मराठी मनोरंजन येऊन बसलें. मासिकाच्या अंतरंगाबरोबर बहिरंग देखील सुंदर व चित्ताकर्षक करण्याची जी अहमहिका आजकाल महाराष्ट्रांतील मासिकांत चालली आहे तिचें सर्व श्रेय मनोरंजनालाच आहे. 'मनोरंजन' आज सर्वांच्या वत्सलतेचें ठिकाण झालें आहे. स्त्रिया व मुलें यांना तर तें आवडतेंच परंतु 'पुरेत बोवा या भिकार प्रणयाच्या कथा; अगदीं कंटाळा आला आहे यांचा; हल्लीं कांहीं तरी (Solid) सॉलीड हवें,' असे प्रलाप काढणारे शिष्ट देखील मनोरंजनाचा अंक दृष्टीस पडतांच जिभल्या चाटीत, तो दुसऱ्याच्या हातून घटकाभर ओढून घेण्याचा प्रयत्न करीत असतात! मनोरंजनाच्या प्रत्येक वर्गणीदाराला हा अनुभव आला आहे. आणि ही एकच गोष्ट मनोरंजनाच्या लोकप्रियतेची साक्ष पटविण्यास पुरेशी आहे.

मनोरंजनाबद्दल महाराष्ट्राला आपलेपणा वाटत आहे. मनोरंजन ही महाराष्ट्राची संस्था आहे असे अभिमानाचे उद्गार सहजगत्या मराठी वाचकांच्या मुखानें बाहेर पडतात. या उद्गारांत कै. मित्रांची कर्तबगारी साठविली आहे. जवळ पैसा नाहीं, मोठे जाडे स्नेही नाहींत, फारसें शिक्षण नाहीं असा मराठी शाळेंतील सामान्य मास्तर मुंबईला येतो, विलायती मासिकाच्या तोडीचें मासिक मराठींत निघालें पाहिजे अशी महत्वाकांक्षा धरतो, आणि थोड्याच दिवसांत बोलण्याप्रमाणें कृतीही करून दाखवितो हा अद्भुत चमत्कार कसा घडला? मित्रांचें शिक्षण बेताचेंच झालें होतें तरी त्यांनीं मराठीचा चांगला अभ्यास केला व बंगाली शिकून कांहीं बंगाली पुस्तकांचें स्वतः मराठींत भाषांतर करून मायभाषेची सेवा केली. त्यांच्या गोड स्वभावामुळें लेखकांवर ते चांगलीच छाप ठेवीत, आणि मनोरंजनांत उत्तमोत्तम लेखकांचे लेख प्रसिद्ध होण्याला हीच गोष्ट उपयोगी पडली. स्त्रिया व मुलें यांना वाचनाची गोडी लावून नव्या मनूंतील नवे विचार त्यांच्यापुढें मांडणें हेंच मनोरंजनाचें ध्येय होतें, आणि तें ध्येय त्यांनीं किती उत्तम रीतीनें बजाविलें हें गेल्या पंचवीस वर्षांचे अंक वरवर चाळून पहाणाऱ्यासही कळण्यासारखें आहे. स्वदेशी चळवळीच्या वेळीं मनोरंजनानें स्वदेशीचा पुरस्कार केला, आणि राजकीय चळवळ जोमानें सुरू झाल्यावर, त्या चळवळीवर दर महिन्याला दहाबारा पृष्टें आपले निर्भीड प्रासंगिक विचार प्रकट करण्याला मनोरंजन कधींही कचरलें




अनुक्रमणिका



नाहीं. स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह, समान हक्क, जातीभेद वगैरे सामाजिक प्रश्नांची सांगोपांग चर्चा करण्यांत तर मनोरंजनानें अग्रेसरत्व मिळविलें आहे.

परंतु राजकीय चळवळींत मनोरंजनानें हैदोसदुल्ला केला नाहीं, किंवा नामदार गोखल्यांसारख्या श्रेष्ठ पुरुषावर ... ... निर्लज्जपणाचे आरोप केले नाहींत आणि या पापाबद्दलच महाराष्ट्रांतील एका प्रसिद्ध संपादकांनीं आपल्या पत्रांत मित्रांवर स्फुट लिहितांना त्यांच्या स्मृतीवर खालील पुष्पांजली वाहिली. " त्यांतील ( मनोरंजनांतील ) कित्येक लेखांमुळें विशेषतः स्त्रिया व तरुण विद्यार्थी यांच्या विचाराला अनिष्ट वळण लागण्याचा संभव होता." ... ...

स्त्रिया व मुलें यांना प्रचलित सामाजिक व राजकीय चळवळीची त्यांना रुचेलच व पचेल अशा रीतीनें प्रथम मनोरंजनानेंच ओळख करून दिली. शर्करावगुंठित औषधाची गोळी गिळण्यास मुलें कचरत नाहींत, या व्यवहारांतील सामान्य ज्ञानाचा मनोरंजनानें फारच उत्तम रीतीनें उपयोग करून घेतला. कै. मित्रांची कुशलता यांतच व्यक्त होते. परंतु प्रचंड छापखाना घरीं पाणी भरत असतांना देखील सचित्र मासिक काढण्याची बुद्धी ज्यांना मनोरंजनाला मिळालेल्या अपूर्व यशामुळें सुचली, त्यांचें वेळीं अवेळीं कौतुक करणाऱ्यांना कै. मित्रांनीं त्यांच्याप्रमाणें राजकीय चळवळींत 'अलख् दूर!' म्हणून आरोळ्या ठोकल्या नाहींत याबद्दल विषाद वाटणें साहजिक आहे; आणि म्हणूनच स्त्रियांना शिक्षण देण्याच्या वेळीं द्रव्याच्या आड लपलेला पान्हा त्यांना या वेळीं स्त्रिया व मुलांच्यासाठीं फुटला!

पण असें निंदकाचें घर शेजारीं असल्यामुळें कै. मित्रांची योग्यता लवमात्रही कमी होत नाहीं. 'मनोरंजनाच्या' संस्थापकाबद्दल महाराष्ट्राला खात्रीनें सदैव सादर प्रेम वाटेल, आणि जोंपर्यंत मनोरंजन चालू आहे, तोंपर्यंत त्यांचे नांव लोकांच्या दृष्टीआडही होणें शक्य नाहीं!

नारायण केशव बेहेरे.

( ९ )

" मराठी 'मनोरंजक वाङ्मय' जान्हवीचा प्रचंड प्रवाह आज पावशतकपर्यंत महाराष्ट्रांत वाहवून असंख्य वाचकांची तृप्ति करणाऱ्या ह्या महाराष्ट्र भगीरथाच्या प्रयत्नाचें कोणता महाराष्ट्रीय कौतुक करणार नाहीं ? "

जनार्दन स. कुडाळकर.

( १० )

" रा. मित्रांचा व माझा बराच परिचय होता. तेवढ्यांत त्यांच्या मनमिळाऊपणाचा, अचल निश्चयाचा, भाडशी पण दूरदर्शी स्वभावाचा चांगलाच अनुभव आला होता. त्यांच्या अकालिक निधनानें महाराष्ट्र साहित्याची मोठी हानि झाली आहे."

विष्णु गोविंद विजापूरकर.





अनुक्रमणिका

(११)

ज्यांनीं आपल्या आयुष्यांतील जवळ जवळ दोन तपांपेक्षां अधिक काळ मराठी वाङ्मयाच्या द्वारें महाराष्ट्राच्या सेवेंत वेचिला, मराठी वाङ्मय समृद्ध करून ठेविलें, महाराष्ट्राचें प्रिय होऊन बसलेलें मासिक पुस्तक जें 'मनोरंजन' तद्द्वारा महाराष्ट्राला समाजसुधारणेच्या बाबतींत महत्वाचें वळण लावलें, ते आपले स्नेही श्रीयुत काशीनाथ रघुनाथ मित्र परलोकवासी झालें हें वर्तमान ऐकून ज्याला दुःख झालें नसेल असा महाराष्ट्रीय विरळा. आरंभीं इंग्रजी शिक्षण बिलकुल नसतां, पैशाचें पाठबळ नसतां, कोणाचीही ओळखदेख नसतां, अर्थात् कोणत्याही बाजूनें कोणत्याच प्रकारचे कोणाचेंहि सहाय्य नसतां, कोंकणांतून येऊन, मुंबईसारख्या अफाट शहरांत आपला मार्ग काढून महाराष्ट्राच्या कर्त्या पुरुषांत त्यांनीं आपली गणना करून घेतली यावरून त्यांच्या अंगीं असामान्य कृतत्वशक्ति होती हे निःसंशय होय. केवळ आपल्या तुट-पुंज्या मराठी शिक्षणाच्या आधारावर मराठी भाषेंत पंचवीस वर्षांपूर्वी त्यांनीं 'मासिक मनोरंजन' सुरु करण्याचें धाडस केलें, हलुहलु आपल्या सभोंवतीं विद्वान् मित्रमंडळ जमवून त्यांच्या सहाय्यानें स्वतःच्या हिंमतीवर त्या मासिकांत क्रमशः अनेक सुधारणा घडवून आणिल्या, आणि शेवटीं त्यास इग्लंडांतील श्रेष्ठप्रतीच्या मासिक पुस्तकाच्या बरोबरीला आणून बसविले. त्यांनीं आपल्या 'मनोरंजक ग्रंथप्रसारक मंडळी'च्या विद्यमानें विद्वान्, अनुभवशीर व कसलेल्या लेखकांकडून उत्तम उत्तम ग्रंथ लिहून घेऊन मराठी वाङ्मय सधन करून त्यास उच्च दर्जास आणून सोडिलें. व हें आपलें कार्य अव्याहत चालावें म्हणून सरते शेवटीं आपला स्वतःचा स्वतंत्र असा एक छापखाना काढून त्यासहि अल्पावधींत मुंबई शहरांतील एक नमुनेदार छापखाना बनविला. ह्या त्यांच्या सर्व अजब कामगिरीची माहिती आतां सर्व महाराष्ट्रीयांस झालीच आहे. तीस त्यांच्या आंगचे लोकोत्तर गुणच कारणीभूत झाले आहेत. काशिनाथपंतांचा स्वभाव फार शांत, प्रेमळ, मनमिळाऊ व परोपकारी असा असून त्यांच्या आंगीं आर्जवशक्तिही चांगली होती. त्यांचें बोलणें फार गोड असून मनवळविणारें होतें. कोणाचें कोणत्याच कारणास्तव मन दुखविणें हें केव्हांहि त्यांच्या हातून घडून आलें नाहीं. उलट रागीट प्रकृतीच्या माणसाचा राग हे आपल्या भाषणानें व प्रेमळ वागणुकीनें घालवून त्यास शांत करीत. या त्यांच्या सुस्वभावामुळें त्यांस सन्मित्रांची वाण अशी केव्हांच भासली नाहीं. हे खरोखर लोकमित्र होते व हें त्यांचें लोकमित्रत्व त्यांनीं संपादन केलेल्या यशाचें आदिकारण होय असे म्हणण्यास हरकत नाहीं. आत्मविश्वास हें त्यांचें दुसरें कारण. कोणतेंही हातीं घेतलेलें काम असाध्य आहे असें त्यास सहसा वाटत नसे व तें आपल्या हातून पार पाडण्याचें सामर्थ्य आपणामध्यें आहे अशी त्यांची नेहमीं खात्री असे. त्यांत आणखी धाडशी स्वभावाची भर पडली तेणें करून अंगीकृतकार्यांत यशापयशाचा, लाभहानीचा विचारहि त्यांच्या मनाला शिवत नसे. कोणतेंही कार्य एकदां हातीं घेतलें कीं तें तडीस पोहोंचेतोंपर्यंत हातचे सोडावयाचे नाहीं—मग त्यांत कितीही विघ्नें येवोत—हा त्यांचा निर्धार; चिकाटी व उद्यमशीलता हे त्यांचे सहज गुण होते. त्यांचा उद्यम एवढा दांडगा होता कीं, कोणतेंही काम हातीं असलें मग त्या कामाशिवाय त्यांस दुसऱ्या कशाचाच ध्यास नसे. जेवणाखाण्याचेंहि भान नसे. वरील गुणां शिवाय आह्मा हिंदी लोकांमध्यें क्वचित आढळून येणारा एक अमोलिक गुण जो यांचे अंगीं होता तो कल्पकता (originality) हा होय. नेहमीं विचार करून कांहीं तरी नवीन कल्पना किंवा योजना शोधून काढणें व ती अंमलांत आणण्याचा प्रयत्न करणें हा तर त्यांचा स्वभावच बनला होता. एखादी नवीन कल्पना काढली कीं, त्यांच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें तां ते आपल्या मित्रमंडळीपुढें ठेवीत व तिच्या गुणदोषांबद्दल त्यांचें मत घेत. व नंतर स्वतः आपल्याशीं विचारपूर्वक ठरवून ती अंमलांत





अनुक्रमणिका

आणीत. मनोरंजन' त्याच्या हल्लींच्या योग्यतेस चढण्यास त्यांच्या आंगचीं कल्पकता बऱ्याच प्रमाणानें कारणीभूत झाली. काशिनाथपंतांच्या चरित्रापासून आमच्या तरुण पिढींतील सुशिक्षितांनीं पुष्कळ धडे घेण्यासारखे आहेत. ही तरुण मंडळी एकदां विश्वविद्यालयाच्या चरकांतून सुटली कीं, त्यांचा धोपट मार्ग ठरलेला. बहुशः एल्. एल्. बी. किंवा नोकरी. आजूबाजूला त्यांस दुसरे कांहीं मार्गच उमगून येत नाहींत असें होतें. काशीनाथपंतानीं उच्च शिक्षणाच्या अभावीं जी कामगिरी करून दाखविली तशा प्रकारची कामगिरी आमच्या सुशिक्षित तरुण मंडळींना किती तरी अधिक पटीनें करून दाखवितां येण्यासारखी आहे. मात्र काशीनाथपंतांच्या आंगच्या ज्या गुणांचें वर्णन वर केलें आहे तें संपादन करण्याच्या तयारीस त्यानें लागलें पाहिजे मग दुसऱ्या कशाची उणीव त्यांस उरणार नाहीं.

काशीनाथपंत स्त्रीशिक्षणाचे पक्के पुरस्कर्ते होते. "यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः" "गृहं तु गृहिणीहीनं कान्तारादतिरिच्यते" हीं त्यांचीं ध्येयवाक्यें होतीं. स्त्रीशिक्षणाचा प्रसार हें मनोरंजनाचें आद्य ध्येय होय. आरंभीं या कार्याकरितां त्यांनीं आपलें कुटुंब प. वा. श्रीमती मनोरमाबाई मित्र यांच्या संपादकत्वाखालीं "महाराष्ट्र महिला" या नांवाचें स्वतंत्र मासिक चालविलें होतें. हें खरोखरच त्या कार्यास वाहिलेलें नमुनेदार मासिक असून लोकादरास बरेंचसें पात्र झालें होतें. हें अजमासे दोन वर्षें चाललें. पुढें तें मनोरंजनाच्या वाढत्या कामामुळें बंद ठेवण्यांत आलें हें दुर्दैव होय. परंतु त्यांतील सर्व विषयांचा अंतर्भाव 'मनोरंजना'त करण्यांत आला. स्त्रीशिक्षणाचें कार्य मनोरंजन उत्तम प्रकारें करीत आलें आहे, हें सांगणें अनवश्यक आहे. काशीनाथपंत कट्टे सुधारक होते त्यांस जातिभेद बिलकूल संमत नव्हता. आपलें राष्ट्र उदयास येण्यास तो फारच विघातक आहे असें त्यांचें मत होतें. प्रौढ विवाह, पुनर्विवाह, मिश्रविवाह समाजांत रूढ होणें इष्ट आहे असें त्यास वाटे. निरनिराळ्या प्रसंगांतीं विविध सामाजिक विषयावर आपल्यांतील थोर व विद्वान् माणसांचे लेख वेळोवेळीं प्रसिद्ध करून त्यांनीं समाजसुधारणेच्या कार्यास फार महत्वाची मदत केली आहे समाजसुधारणेचें सर्वांगीण गाडे पुढें ढकलण्याचे त्यांचे प्रयत्न मनोरंजनाच्या द्वारें सतत चालू होते व ते प्रयत्न सर्वांस प्रिय व्हावेत अशाच धोरणानें चालू होते. मनोरंजन पूर्ण सुधारणावादी असून तें सुधारकांस व जुन्या पक्षास उभयतांसहि सारखें प्रिय झालें होतें, ही गोष्ट लक्ष्यांत घेतांना आपलें धोरण व ध्येय अव्याहत कायम राखण्यांत त्यांनीं जी विलक्षण कर्तबगारी व मानसिकधैर्य दाखविलें त्याचें सहसा कौतुक वाटल्यावांचून रहात नाहीं.

सरते शेवटीं काशीनाथपंतांच्या चरित्रासंबंधानें विशेष गोष्ट सांगावयाची म्हणजे त्यांची अढळ नीतिमत्ता व परम धर्मशीलता. यांच्या मजबूत पायावर काशिनाथपंतांच्या शीलाची उभारणी झाली होती. त्यामुळें ते वंदनीय होते. त्यांनीं आपल्या आंगांतील कोणत्याही गुणांचे वेळीं अवेळीं केव्हांही लोकांत प्रदर्शन केलें नाहीं कारण प्रदर्शन करण्याचा त्यांचा स्वभावच नव्हता. ते नेहमीं त्या दृष्टीनें एकांतप्रिय होते व समाजांत पुढें पुढें वावरण्याची त्यांना केव्हांहि इच्छा नव्हती. परंतु त्यांच्या सच्छीलाचा छाप 'मनोरंजना'वर स्पष्टपणें उमटलेला होता. 'मनोरंजन' सुधारक होतें; परंतु तें नीतिमान् व धर्मशीलहि होतें हें विसरतां कामा नये. यामुळेंच त्याचा दर्जा मराठी नियतकालिक वाङ्मयांत उच्चप्रकारचा होता. काशीनाथपंतांचें धार्मिक ध्येय थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे कविवर्य ना. वा. टिळक यांनीं आपल्या सुंदर व हृदयंगम 'लोकमित्र' या पद्यांत वर्णिल्या प्रमाणें—




अनुक्रमणिका

" जनसेवा ही ईश्वरसेवा । याविण दुसरा धर्म न ठावा ।
प्रेम आणखी देव दिसावा । एक सदां ज्यांतें "

हें होय. शेवटीं याच कविवर्यांच्या शब्दांनीं—

धन्य, धन्य, ह्या धन्य विभूती ! प्राप्ती यांची स्वर्गप्राप्ती ।
देवा, त्यांची भारत जगती । वाट सदा बघते !

असें आळवून काशीनाथपंतासारखे सन्मित्र व लोकसेवक या भरतभूमीवर तिच्या कल्याणाकरितां सदैव अवतरोत अशी परमेश्वरापाशीं अनन्यभावानें प्रार्थना करूं या.

**गोविंद मल्लिनाथ ठेंगे.**

**रा. मित्रांचे कांहीं विशेष गुण. पहिला विशेष गुणः—आत्मविश्वास** व त्याचा सहचारी गुण दृढप्रयत्न या गुणांचे विशेषत्वामुळें त्यांना आज सारखी पंचवीस वर्षें स्वदेशाची व स्वभाषेची सेवा एकनिष्ठपणानें बजावितां आली अल्पारंभः क्षेमकरः या नात्यानें त्यांनीं आरंभ कसा केला व या आरंभाला अधिकाधिक महत्व आणि अधिकाधिक रमणीयत्व कसें येत गेलें हे सर्वांना माहीत आहे. त्यांचें सात्विक धैर्य व सात्विक साहस यांकडे या यशाचें श्रेय येत आहे.

**दुसरा विशेष गुणः—भगवंतावर विश्वास.—सत्यसंकल्पाचा दाता भगवान सर्व करी पूर्ण मनोरथ** हें श्रीतुकाराम महाराजांचे वचन त्यांना इहलोकच्या यात्रेंत वाटाड्याप्रमाणें झालेलें होतें व त्यांच्या मासिकाच्या प्रत्येक अंकावर छापतें जात असतें हें सर्वांस माहीत आहेच.

**तिसरा विशेष गुण सौजन्यः**—त्यांचे बोलणें आणि वागणूक ज्यांना माहिती आहेत असे शेकडों लोक आहेत. आपल्याशीं मतभेद असणारांशीं सुद्धां विनयानें व स्नेहाला धक्का न लावितां कसें बोलावें या बाबतींत त्यांचे वर्तन उदाहरणीय होतें; हा त्यांचा गुण इतरत्र दुर्मिळ आढळतो ही देशाच्या दुर्दैवाची गोष्ट आहे. या विशेष गुणामुळें परस्परांशीं अलग भावानें असणाऱ्या अशा बहुतांशीं रा. काशीनाथपंत उत्तम स्नेहानें वागूं शकत होते ही गोष्ट सध्याच्या सारख्या काळांत सामान्य नव्हे विशेष आहे.

**चवथा विशेष गुणः**—देशाची उन्नति सर्व बाजूंनीं व्हावी ती एकांगी नसावी इकडे त्यांचें लक्ष असे. हें मनोरंजनाशिवाय संतांचे ग्रंथ, लोकोत्तर व्यक्तींचीं चरित्रें इत्यादि संबंधी प्रकाशनाचें कार्य त्यांनीं केलें. तसेंच व्यवसाय संभाळून फुरसतींत, शिक्षण सहायक व समाज प्रगतिकारक अशा अनेक संस्था प्रीत्यर्थ मनोभावानें सेवा केली यावरून व्यक्त होत आहे. भाग्यशाली प्रजा उदयास येण्यास जननी श्रेष्ठ गुण संपन्न पाहिजेत आणि यासाठीं स्त्रीवर्गाची उन्नति होण्याकरितां झटलें पाहिजे या मताचे ते निःसीम पुरस्कर्ते होते. **यत्रनार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः** हें स्मृतिवाक्य त्यांनीं आपले मासिकाचे द्वारा सर्वांचे घरीं नेलें व सर्वतोमुखीं केलें: या धोरणाला अनुसरून आपल्या महाराष्ट्र वाङ्मय वनिकेमध्यें बहुत रमणीय तरुवल्लींची निर्मिती त्यांचेकडून झालेली आहे. हें एक त्यांचें स्मारकच होय.

**वामन रामचंद्र जोशी.**

### एक आठवण

सन १९०९ च्या आगष्ट महिन्यांतील एके दिवशीं सकाळीं अस्मानी रंगाचा जरीचा **रूमाल** डोक्याला बांधलेलें, कपाळावर एक लहानशी गंधाची तांबडी टिकली लावलेले, पायांत पायमोजे व बूट घातलेले व हातांत एक लहानशी **हँडबॅग** असलेले एकंदरीनें **टापटीपदार** व नीटनीटके—सारांश प्रथमतः पहाणाराचा अनुकूल ग्रह उत्पन्न करणारे गृहस्थ माझेकडे आले. त्यांनीं मी मासिक मनोरंजनचा संपादक म्हणून आपण होऊन आपला मला परिचय करून दिला. मी या मासिकाचा आधींपासूनच वर्गणीदार असल्यामुळें ते मला नांवानें पुष्कळ दिवस ठाऊक होते. याप्रमाणें परिचय झाल्यावर त्यांनीं 'मी दिवा-




अनुक्रमणिका

ळीचा खास अंक काढीत आहे; तरी आपण त्या करितां एक लेख लिहावा अशी विनंति करण्याकरितां आलों आहें'. मी ह्मटलें 'मी येथल्या विधवा विवाह मंडळीचा चिटणीस आहे. या विषयावर मी एक लेख लिहीन पण तो आपल्याला पसंत पडेल किंवा नाहीं तें मला ठाऊक नाहीं", ते ह्मणाले 'माझी मतें सामाजिक सुधारणेस पूर्णपणें अनुकूल आहेत व समाजांत सर्व बाजूनें सुधारणा व्हावी व त्याकरितां खऱ्या मतांचा प्रसार व्हावा असाच माझ्या मासिकाचा उद्देश आहे तरी आपण या विषयावर अवश्य लिहा, त्याप्रमाणें मीं कबूल केलें व थोड्या दिवसांत लेख लिहून पाठविला. रा. मित्रांचें लेख आपल्याला फार आवडला अशाबद्दल उत्तर आलें व खास अंक प्रसिद्ध झाल्यावरही त्याचें आपला लेख पुष्कळ लोकांना आवडला आहे' असें कळविणारें पत्र आलें, व त्या पत्रांत 'तुह्मीं माझ्या मासिकास नेहमीं लेख लिहावे अशी विनंतिही होती, याप्रमाणें रा. मित्र यांची व माझी ओळख झाली व ती त्यांच्या मरणापर्यंत टिकली. रा. मित्र पुण्यास आले ह्मणजे माझ्याकडे आल्याखेरीज रहात नसत व मी ही मुंबईस गेल्यावर त्यांना भेटल्याखेरीज रहात नसे.

रा. मित्र यांचा मृत्यु ह्मणजे महाराष्ट्रावर खरोखरींच मोठी आपत्ति होय यांत शंका नाहीं. त्यांची वाङ्मय प्रसाराची हौस आपल्या मासिकाची प्रगति करण्याची कळकळ अवर्णनीय होती. वाचकांना आपलें मासिक प्रिय कसें होईल हा त्यांना रात्रंदिवस निजिध्यास लागलेला असे. वर्षाकाठीं वाचकांना बक्षीस पुस्तकें देणें, निरनिराळ्या प्रसंगीं खास अंक काढणें, मासिकांत निरनिराळ्या ठिकाणचें फोटो देणें; तसेंच निरनिराळ्या संस्थाची हकीकत देणें तसेंच निरनिराळ्या वादग्रस्त विषयांवर निरनिराळ्या लोकांची मतें मागवून छापणें; वगैरे वगैरे निरनिराळ्या युक्त्या योजीत असत. सारांश आपलें मासिक लोकप्रिय होऊन त्याच्या द्वारें लोकशिक्षण व लोकसेवा घडावी अशी त्यांची फार इच्छा असे. तसेंच आपलें मासिक इंग्रजी सचित्र मासिकाच्या बरोबरीचें व्हावें व आपण तसें ते करणार असे ते नेहमीं ह्मणत असत. दुसऱ्या छापखान्यावर अवलंबून राहिल्यामुळें आपल्याला मनाप्रमाणें काम होत नाहीं असें पाहून त्यांनीं मासिकमनोरंजनाचा स्वतःचा छापखाना काढण्याची खटपट केली. व त्यांच्या अंगच्या हिंमत धाडस व उद्योग इत्यादि गुणामुळें त्यांनीं तें काम पार पाडलें व मनोरंजन छापखाना मुंबईतील चांगल्या छापखान्यापैकीं एक झालेला आहे.

रा. मित्र यांच्यामध्यें किती तरी चांगले गूण होते. आधीं ते नांवाचेंच नव्हे तर खरोखरींच मित्र होते; त्यांना स्नेही जोडण्याची व त्यांची मैत्री कायम ठेवण्याची कला चांगली अवगत होती. त्यांच्यामध्यें व्यवस्थितपणाही विशेष असे. मी त्यांच्या छापखान्यांत नेहमीं जात असे. तेथली व्यवस्था पाहून मनाला आनंद वाटे.

रा. मित्रांना गेली पांच वर्षे फार अडचणीची गेलीं हे मला माहीत आहे. कारण त्यांनीं छापखान्याचें मोठे जबाबदारीचें काम हातीं घेतलें व तेव्हां पासून लढाई सुरू झाली व त्यामुळें छापखान्यांच्या कामांत फार अडचणी येऊं लागल्या. व अशा अडचणीच्या दिवसांतसुद्धां त्यांनीं छापखाना यशस्वी करून दाखविला. या अडचणीचाच त्यांना कामाचा फार बोजा पडला; व ते पण त्यांनीं प्रकृतीकडे पाहिलें नाहीं; जीवापाड मेहनत केली; पैशाच्या दृष्टीनें अडचणीचें दिवस असतांना आपल्या मासिकांची वर्गणी वाढविली नाहीं व पैशाच्या दृष्टीनें नुकसान होत असतां मासिक नेटानें चालविलें. आजारी असतांना सुद्धां त्यांना मासिकाची भावी स्थिति त्यांच्या डोळ्यापुढें असे.

रा. मित्र यांच्या मरणानें वाङ्मयाच्या धंद्यांतलि एक धाडसी माणूस नाहीसा झाला यांत शंका नाहीं. त्यांच्या पश्चात् त्यांनीं काढलेलें मासिक पुस्तक व छापखाना उत्तम तऱ्हेनें चालवून मित्र यांनीं ज्याप्रमाणें दोन तपें वाङ्मयसेवा केली त्याप्रमाणें सेवा करीत रहाणें हेंच मित्राचें खरें स्मारक आहे. ते मागें राहिलेली मंडळी करतील अशी आशा करून रा. मित्राबद्दलचा हा त्रोटक व छोटा स्मृतिलेख पुरा करतो.

गो. चि. भाटे.

---





अनुक्रमणिका